गुरुवर्य बळवंत गणेश उर्फ अण्णासाहेब खापर्डे

अध्यापक

हिंदु विश्वविद्यालय बनारस यांस

# अर्पण

कृष्णाकुमार एम. ए.

# अनुक्रमणिका



# प्रकाशकाची प्रस्तावना

'वाग्विलास मंडळ' या संस्थेला, प्रकाशनाच्या कार्याला आरंभ केल्यापासून तीन महिन्याच्या आंत 'मराठवाड्यांतील गद्य लेखक' हें 'कृष्णाकुमार' एम. ए. या कसलेल्या लेखकाचें पुस्तक वाचकांच्या हातांत देण्यास आनंद होत आहे. प्रकाशनाचा कटु अनुभव असतांना हें काम संस्थेनें अंगावर घेतलें असून त्यांत योग्य प्रयत्नामुळें जनतेची सहानुभूति मिळत आहे व ती दिवसेंदिवस वाढत जाईल अशी आम्हांस आशा आहे.

प्रकाशनाच्या कार्यास आरंभ केल्यापासून निरनिराळ्या विद्वान् व रसिक लोकांच्या भेटी आम्हांस घ्याव्या लागल्या. त्या सर्वांनीं या योजनेस सक्रिय मदत करण्याचें आश्वासन दिलें; व कांहींनीं तर विलंब न लावतां ताबडतोब आपला भाग दिला याबद्दल आम्ही त्या सर्वांचे आभारी आहों. या सर्व विद्वान् लोकांच्या भेटींत या प्रकाशना संबंधीं जी थोडी चर्चा झाली, त्यासबंधीं थोडा उल्लेख करणें येथें अनाठायीं होणार नाहीं. या सर्व लोकांनीं केलेल्या सूचना अमलांत आणण्याचें जर मंडळानें ठरविलें तर कोणतेंही प्रकाशन होणें अशक्य आहे. सर्वांची आवड केव्हांही एक नसते. त्यामध्यें विविधता आढळून येते. केवळ विविधता असेल तर हरकत नाहीं; पण त्या आवडीमध्यें विरोध असेल तर कार्यच होणें शक्य नाहीं. कोणी लघुकथांना नांवें ठेवतो, तर कोणी काव्यासंबंधीं आपलीं नावड प्रदर्शित करतो. कोणी निबंधांना निरस ठरवितो व कोणी नाटकांना 'चछोर' समजतो. कोणी लघुकथे संबंधीं आपलें प्रेम व्यक्त करतो तर कोणास काव्यासंबंधीं फार उमाळा येतो. अशा भिन्न प्रकृतीच्या व आवडीच्या लोकांना रुचणारा व पचणारा एक वाङमय प्रकार असणें शक्य नाहीं. तसा तो नसल्यामुळें सर्वांना आवडणारें प्रकाशन होणें शक्य नाहीं. मंडळानें या सर्वांचा सारासार विचार करून तीन विद्वान् परीक्षकांच्या मतानें ठरणारें प्रकाशन करावें असें ठरविलें

असून ' वाग्विलास ग्रंथमालेचें ' पहिलें पुष्प म्हणून ' मराठवाड्यांतील गद्य वाङमय ' हें पुस्तक प्रकाशित केलें आहे.

या पुस्तकासंबंधीं असलेले सामान्य आक्षेप मान्य करूनही त्याचें महत्व लक्षांत घ्यावयास पाहिजे. या पुस्तकानें येथील गद्य वाङमयाची त्रोटक कल्पना येऊन त्या संबधींची संकलित माहिती वाचकास उपलब्ध होते. आमच्या मराठवाड्यांत खरोखरच कांहीं उत्तम लेखक आहेत ही जाणीव तरी मराठवाड्यांतील सर्व महाराष्ट्रीय लोकांना आहे काय ? नांदेडच्या कानोल्यांचें लिखाण ऐतिहासिक दृष्ट्या अमोल आहे, याची किती लोकांना कल्पना आहे ? दिवाकर कृष्णांचें लघुकथा व कादंबरी या क्षेत्रांतील महत्व किती लोक ओळखतात ? बालशंकर व बी. रघुनाथ या तरुण व उत्साही लेखकांच्या लेखणींतील तेज किती लोकांनीं पाहिलें आहे ? योग्य कार्यक्षेत्र, लिखाणाला अवसर व अवश्य असलेलें उत्तेजन या गोष्टींच्या अभावीं असे अनेक हिरे अद्याप तसेच बाजूला पडलेले आहेत. त्यासाठीं समाजानें कार्यक्षेत्र निर्माण करावयास नको काय ? त्यांच्या प्रकाशनाला अवसर देऊन त्याचा प्रसार करण्याची व्यवस्था समाजानें करावयास नको काय ? योग्य मोबदला तर दूर राहिला, पण अधिक लिखाण लिहिण्यास उत्तेजन देऊन त्यांचा गौरव समाजानें करू नये काय ? पण या गोष्टीची जाणीव समाजाला आहे कोठें ? ती जर असती तर मराठवाड्याचा भाग वाङमयाच्या दृष्टीनें एवढा मागें कां राहिला असता ? सारांश, मराठवाड्यांतील गद्य वाङमयासंबंधीं संकलित माहिती देणारें हें पुस्तक रसिक वाचकांना उपयुक्त वाटेल यांत शंका नाहीं.

दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे या पुस्तकानें मराठवाड्यांतील गद्य लेखकांचें वाङमयांतील स्थान कोणतें लागेल हें ठरविण्यास मदत होईल. हा टीकात्मक ग्रंथ असल्यामुळें येथील गद्य–वाङमयाचें त्यांत थोडक्यांत परीक्षण असून त्याचें महत्व जनतेला सहज पटू शकेल. आपलें गद्य वाङमय जें आहे तें हें आहे. तें चांगलें आहे कां वाईट आहे, हें वाचकानें ठरवावें. त्याचें त्रोटक व संकलित स्वरूप लेखकानें आपल्या समोर ठेविलें आहे. त्यावरून

कांहींना तें सर्व वाङमय वाचण्याची इच्छा होईल व ते वाचल्यानंतर वाचकाला या वाङमयासंबंधीं आपलें मत बनवितां येईल. वाङमयाचा तौलनिक अभ्यास करणारास हें वाङमय वाचून या लेखकांचें वाङमयांतील स्थान ठरविण्यास मदत होईल.

मराठवाड्यातील प्रमुख गद्य वाङमयासबंधी संकलित माहिती जरी या पुस्तकात आली असली तरी प्रस्तुत ग्रथ कर्त्यांच्या लिखाणासंबंधीं त्यांत कांहीच माहिती नाही. येथील गद्य वाङमयाच्या पुस्तकांत त्यांची व त्यांच्या लिखाणाची माहिती नसणें अयोग्य होईल. सौजन्य व विनय या दोन गुणांमुळे स्वतःच्या लिखाणासबधी त्यानीं कांहींही लिहिलें नाहीं व तसें करणें शिष्टाचाराच्या दृष्टीनें इष्टही नव्हतें. कोणी तरी तिऱ्हाइतानें तें काम करणें इष्ट आहे या दृष्टीनें त्याच्या लिखाणासंबधीं येथें थोडक्यांत माहिती देण्याचें आम्हीं योजिलें आहे

रा. सेतु माधवराव पगडी एम. ए. यांचें टोपण नांव ' कृष्णाकुमार ' असून नांदेडचे कवि ' कृष्णाकुमार ' हे निराळे सद्गृहस्थ आहेत. केवळ नामसादृश्याशिवाय त्यांच्यांत कांहीं साम्य नाहीं रा पगडी हे सुविद्य पंडित असून त्यांचा लिहिण्याचा व्यासंग व हौस फार दांडगी आहे. अभ्यासू व रसिक वृत्ति असल्यामुळें त्यानीं महत्वाच्या नोकरीची जबाबदारी संभाळून अगदीं थोड्या काळांत बरीच वाङमय निर्मिति केली आहे. ' गद्य लेखक ' हें त्यांचें ४ थें अपत्य असून यापूर्वींचीं तीन जनतेच्या पूर्ण परिचयाचीं आहेत. येवढ्या तरुण वयांत ४ अपत्ये झालीं म्हणून कोणी काळजी करण्याचें कारण नाहीं. कारण, अशा अपत्यांची संस्थानाला आज अतिशय गरज असून संतति नियमनाची काळजी त्यांनीं आज करूं नये. त्यांना अशीं अनेक अपत्यें-व तीं याहूनही बाळसेदार अपत्यें होवोत असें आम्हीं इच्छितो.

त्यांना लिहिण्याचा नाद हा बऱ्याच दिवसांपासून आहे. त्यांचें लिखाण आरंभीं नियतकालिकांतून प्रसिद्ध झालें व नंतर ' उषा ' हा त्यांचा लघुकथा संग्रह पुस्तक रूपानें प्रसिद्ध झाला. त्यानंतरचें ' मराठवाड्यांतील आधुनिक कविता ' हें त्यांचें टीकात्मक पुस्तक होय. गेल्या मे मध्यें ' अलकनंदा ' या

नांवानें त्यांचा दुसरा 'लघुकथा-संग्रह' प्रसिद्ध झाला असून 'मराठवाड्यांतील गद्य वाङमय' हे त्यांचें चौथें पुस्तक आतां प्रसिद्ध होत आहे. त्यांचें इतर लिखाणही बरेंच विविध असून कांहीं संशोधनात्मक आहे. ते स्वत: इतिहासाचे विद्यार्थी असल्यामुळें त्यांना संशोधनाचा बराच नाद आहे. येथील अनेक अडचणीमुळें किती तरी लोकांना आपलें लिखाण प्रसिद्ध करण्यास अवसर सांपडत नाहीं. कांहींना तसा अवसर असला तर इतर बंधनामुळें तसें करतां येत नाहीं. तरी पण कृष्णाकुमारांनीं हीं चार पुस्तकें लिहून प्रादेशिक वाङमयात बरीच महत्वाची भर टाकली आहे.

त्यांच्या लिखाणाचें मुख्यत: दोन विभाग पडतात. एक कथात्मक वाङमय व दुसरें टीकात्मक वाङमय 'उषा' व 'अलकनंदा' हीं त्यांचीं दोन पुस्तकें कथात्मक आहेत व मराठवाड्यांतील आधुनिक कविता व गद्य वाङमय हें ग्रथ टीकात्मक आहेत. 'उषा' ह्या कथा संग्रहांत एकंदर २० लघुकथा आहेत. या कथांचा विशेष म्हणजे त्यांतील प्रादेशिकत्व लेखकाचा संस्थानांतील अनुभव विशेषत: खेडेगांवांतील निरीक्षण व स्वत:ची बुद्धिमत्ता यामुळे बट्टेबाज, शापित, प्रवृत्ति या लघुकथांतून येथील विशेषत: खेडेगांवां-तील सामाजिक परिस्थितीवर बराच प्रकाश पडतो. 'एक्स्पेरिमेंट' 'डॉक्टरांचा डायलेमा' या कथांना इंग्रजी नावें देण्याच्या ऐवजी मराठी नांवें अधिक उपयुक्त व उठावदार दिसलीं असतीं बिचाऱ्या सामान्य मराठी वाचकाला एवढे अवजड शब्द कोठून समजावे ? 'एक्सपेरिमेंट' या कथेत मानसशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या अविवाहित तरुणानें एकाद्या मुलीच्या हृदयावर प्रयोग करणें कसें धोक्याचें आहे, हें सूक्ष्म तऱ्हेनें दाखविलें आहे. 'डॉक्टरांचा डायलेमा' या कथेंत डॉक्टरांच्या मनांतील विचाराचे सूक्ष्म धागे दोरे फार सुंदर तऱ्हेनें उकलून दाखविले आहेत. एक अनाथ विधवा डॉक्टरांकडे आली असतांना त्यांच्या मनांत जुन्या संस्कारांचें व सहानुभूतीचें द्वंद्व युद्ध चाललें होतें. शेवटीं सहानुभूतीचा विजय होऊन 'मंगला' त्यांच्या मांगल्याचें निधान झाली. 'बट्टेबाज' ही लघुकथा मराठवाड्यांतील कोणत्याही खेड्यांत दिसणारी गोष्ट आहे. तेलंगणामध्यें अशा गोष्टी क्वचित

दिसतील, पण मराठवाड्यांत मानाजी आहेत व त्यांचा बदला घेणारे सभार्जीही आहेत.

कृष्णाकुमार हे लघुकथा लेखकापेक्षा निबंधकार व टीकाकार म्हणून अधिक शोभतात. त्यांची सूक्ष्म दृष्टि लघुकथांतून जरी दिसत असली तरी ती निबंधांतून टीकानिबंधांतून अधिक दृष्टोत्पत्तीस येते. 'अलकनंदा' या संग्रहात १८ कथा आहेत. या कथांतून प्रादेशिकताच सर्व पूर्णपणें भरली असून मराठवाड्याचें अनेकविध स्वरूप त्यात प्रगट झालेलें आहे या कथांत कांही ऐतिहासिक कथा असून त्या सरस वठल्या आहेत. त्या ऐतिहासिक असल्यातरी त्यात प्रादेशिकतेचें वैशिष्टय आहेच. 'शेवट' या कथेत दौलतखानाच्या आयुष्यांतील एक महत्वाचा प्रसंग सांगून शोकात्मक शेवट दाखविला आहे. दौलतखान हा कळमनूरी परगण्याचा ताहुददार होय. पाडव्याच्या दिवशीं त्याच्या दरबारांत आनंदाचा समारंभ चालू असतां हैद्राबादचे त्यावेळचे नवीन दिवाण नवाब सिराजुल्मुक यांज कडून एक लखोटा आला त्यांत ताहुदीची पद्धत बंद करून रास्त तालुकदार नेमिले आहेत. नवीन तालुकदाराला कायमचा 'जायजा' देऊन निघून येणें असें नवाब साहेबांनीं लिहिलें होतें. कळमनुरीच आपलें सर्व वैभव जाणार हें त्याच्यापुढे दिसूं लागलें त्याच वेळीं त्याला फकीर चंदाशहाचा शाप आठवला. 'माझे केस जसे तूं कापलेस तसेच तुझ्या वैभवाचे पखही लवकरच कापले जातील' दौलतखानाला मागचें व पुढचें चित्र कसें दिसलें हे लेखकानें फार सुंदरप्रकारें चित्रित केलें आहे. यासंबधीं काय करावें हें त्यास सुचेना. शेवटीं शिकारीसाठीं तो घोड्यावर बसून निघाला चित्त्याच्या वासामुळे घोडा बुजला व भरधाव पळत सुटला. दुर्दैवानें अथवा सुदैवाने त्यांत त्याचा अंत झाला. एवढा मोठा शूर सरदार केवळ घोड्यावरून पडून मरण पावला असें संभवत नाहीं. त्यानें मरण आपणावर ओढून आणलें. 'शूराला अपमानापेक्षां मरण पत्करतें' ही गोष्ट फार सूक्ष्मपणें त्यात सूचित केली आहे. 'सवाल' या कथेतील सटव्याच्या 'मला काऊन मारलें' हा सवाल कोणाच्या हृदयांत कळवळा उत्पन्न करणार नाहीं ? 'सर्जेराावासारख्या

आपल्याची आवड स्त्रियांना नैसर्गिक असते हें 'तो दिवस' या कथेंत वर्णिलें आहे. तरुण विधवा वृंदेची भीषण स्थिति 'असहाय आकर्षण !' या कथेंत वर्णिली असून हा प्रादेशिक कथेचा उत्कृष्ट नमुना आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. 'दसरा' व 'प्रमाथी झंझावात' यांत प्रेमवेड्या लोकांना हवेंत न उडतां व्यवहारांच्या कडक उन्हाची चपराक बसली म्हणजे ते कसे ताळ्यावर येतात हें मार्मिपणें दाखविलें आहे. 'मस्तान' या कथेंत भाडोत्री शरीर रक्षकाचा वर्ग येथें कसा असतो याचें समर्पक वर्णन करून 'मस्तान' सारखा अशा वर्गाला अपवाद दाखविला आहे. पण त्यामुळें कथेचें प्रादेशिक वैशिष्ट्य नष्ट झालें आहे. सूज्ञ वाचकाला त्याचा ध्वनि कळल्याशिवाय रहाणार नाहीं. 'साविद्या' या कथेंत वर्णन केलेलें स्वप्न वेदान्तपर असून 'मुक्त हो मुक्त हो' असा जनतेला संदेश देत आहेसें वाटतें. विद्या जर आत्मविश्वास निर्माण करीत नसेल, 'मुक्त हो' असें म्हणत नसेल तर ती विद्याचा नव्हे 'साविद्या या विमुक्तये' या उक्तीनें कथेचा शेवट चांगला साधला आहे. 'अलकनंदा' या शेवटच्या कथेंतील उपकथा शोकपर्यवसायीं असून मृत्यूचा योगायोग-काल कांहीं कोणाला टाळतां येत नाहीं, त्यावाबतीत माणूस असहाय आहे. हें तत्व वर्णन करण्याच्या प्रयत्न केला आहे आंबरस ही कथा केवळ वर्णनपर असून त्यांत कथेचा भाग जवळजवळ नाहींच. बऱ्याच कथा जशा परिणामकारी व्हावयास पाहिजेत तशा झालेल्या नाहींत.

मराठवाड्यांतील आधुनिक कविता व प्रस्तुतचें गद्य वाङमय हीं दोन पुस्तकें टीकात्मक असल्यामुळें अनेक लेखकांच्या लिखाणांवर त्यांत चर्चा केलेलीं आहे. 'आधुनिक कविता' या पुस्तकात १३ कवींच्या काव्या संबंधींची माहिती दिली आहे. या शिवाय इतर कवि संस्थानांत नाहींत असें नाहीं. पण त्यांचीं काव्याचीं पुस्तकें प्रसिद्ध झालेली नसल्यामुळें, त्यांच्या काव्या संबंधीं लेखकानें चर्चा केली नाहीं. कांहीं कवींचें काव्य या १३ कवींपैकीं कांहीं कवींच्या काव्याहून अधिक व सरस असूनही दुर्दैवानें त्यांनीं आपली कविता न छापल्यामुळें त्यांचा समावेश वरील पुस्तकांत होऊं शकला नाहीं. केवळ

उदाहरणासाठीं औरंगाबादेचे ' कृष्णदास ' किंवा वेरूळचे विनायकबुवा यांचा नामनिर्देश केल्यास अनाठायीं होणार नाहीं. मराठवाड्यांतील आधुनिक काव्यसंपत्ति कमी नाहीं. गुणानें तर ती मुळींच कमी नाही. तिला प्रकाशांत येण्यास अवसर न सापडल्यामुळें व योग्य उत्तेजन न मिळाल्यामुळें ती तशीच पडून आहे व तिची वाढ झाली नाहीं. दिवसेंदिवस शिक्षणाच्या प्रसारा बरोबर प्रकाशनाचीं साधनेंही हळुहळू उपलब्ध होत आहेत. त्यांत होतकरू कवींना निश्चित स्थान मिळेल यांत शंका नाहीं.

कवींनीं काव्य लिहिलें, पण त्यांतील उत्कृष्ट रसाचें सेवन स्वत: करणें हें रसिकाचें काम आहे. साध्या लोकांना त्यांतील रसाचा आस्वाद देणें हें रसिक–टीकाकाराचें काम आहे. हें काम कृष्णाकुमारांनीं अत्यंत मार्मिकतेनें केलें आहे. मार्मिक टीकाकार काव्यातील गुणदोषांचें योग्य विवरण करून त्याचें महत्व सामान्य वाचकांस पटवून देतो. रसिक टीकाकारास कोणत्याही गोष्टी कडे पहाण्याची एक विशेष दृष्टि असते. ती सामान्य लोकांत नसल्यामुळें, काव्यांतील रहस्य त्यांच्या सहज ध्यानात येत नाहीं. तें रहस्य टीकाकार वाचकांसमोर मांडतात व सहाजिकच त्यांना काव्याचा आस्वाद चाखता येतो. सारांश कृष्णाकुमारांनीं आपल्या पुस्तकांत येथील आधुनिक काव्याचा सामान्यत: चांगला परामर्ष घेतला आहे.

शेवटीं प्रस्तुत पुस्तका संबधीं थोडेसें लिहून ही प्रस्तावना संपवितो. येथील ' गद्य–लेखकांसंबधीं आपलें लिखाण कृष्णाकुमारांनीं मर्यादित केलेले आहे. केवळ ज्यांचीं पुस्तकें छापली गेली आहेत अशा कांहीं गद्य लेखकां संबंधीं यांत लेख आहेत. रा. वैद्य यांनीं लिहिलेल्या कोरटकर चरित्रांस वाङ्मयदृष्ट्या कांहीं महत्व नसलें तरी मराठवाड्याच्या सामाजिक व सार्वजनिक जीवनला त्यानें एक नवीन दिशा लावली यांत संशय नाहीं. तसेंच पुस्तक रूपानें आपलें लिखाण प्रसिद्ध न करूं शकलेले कांही लेखक आहेत त्यांचें लिखाण विखुरलेलें व त्रोटक असलें म्हणून अनुल्लेखनीय आहे असें नाहीं. रा. र. मु. जोशी. रा. पोहोनेरकर, डॉ. भाले, रा. वाघमारे वगैरे लेखकांचा उल्लेख प्रस्तुत पुस्तकांत करावयास हवा होता

येथील प्रमुख लेखकांच्या लिखाणा संबंधी कृष्णाकुमारानीं केलेलें विवेचन समर्पक असून कांहींचें बरेंच विस्तृत झालें आहे. त्यांची भाषा ओघवती असल्यामुळें व लिखाणांतील योग्य मर्मस्थळें शोधून तीं वाचकांपुढें मांडल्यामुळें हे लेख कंटाळवाणें वाटत नाहींत टीकात्मक लिखाण हें मूळ लिखाणावर उभारलेलें असल्यामुळें त्यांतील गोडीवर टीकात्मक लेखांची गोडी बरींचशी आवलंबून असते. हिरा स्वत: तर प्रकाशमान असतोच, पण त्याला पैलू पाडल्यास तो अधिक सुंदर दिसतो; तद्वत् येथील गद्य-लिखाण चांगलें तर आहेच, पण तें कितपत व कसें चांगलें आहे हें प्रस्तुत पुस्तकावरून वाचकास कळेल,

त्यांची भाषा साधी व सरळ असली तरी तीवर प्रादेशिकतेची छाप बरीच दिसून येते. लेखकाचा बहुतेक काल मराठवाडयाबाहेर गेल्यामुळें परभणी, बीड कडील वाक्प्रचार त्यांच्या लिखाणात दिसत नाहींत उर्दू व इग्रजी या भाषा त्याच्या अधिक परिचयाच्या असल्यामुळें त्यांचा परिणाम त्यांच्या लिखाणावर झालेला दिसतो Melodramatic सारखे इंग्रजी शद्व सामान्य वाचकाला कसें समजावें ? I am hired सारखे इंग्रजी वाक्प्रचार मराठी कथेंतून अस्थानी वाटतात. Tragedy, अपील सारखे शद्व इंग्रजीचें ज्ञान नसलेल्या वाचकास आनंद देत नाहींत.... . human अतएव जास्त जवळचा ' या वाक्यांत इंग्रजी शब्दाजवळ संस्कृत शब्द ठविला आहे. ' मनाच्या एका विशिष्ट पैलूला या गोष्टी बेफामपणें अपील करतात.' अशीं वाक्ये सामान्य लोकांना कशी समजावीं ? केवळ सुशिक्षित समाजच आपलीं पुस्तकें वाचील अशी संकुचित कल्पना लेखकानें न ठेविलेली बरी. चार पुस्तकें शिकलेला एकादा गिरणींतील मजूर आपल्या अक्षर-शत्रु निघाला हीं पुस्तकें वाचून दाखवू शकेल. निदान अशा शब्दांचा अर्थ तरी मराठींत पुढें द्यावयास पाहिजे होता त्यामुळें इंग्रजी न येणाऱ्या वाचकांची गैरसोय होते, व त्यांचा कांहीं वेळेस हिरमोड होतो. प्रस्तुत ग्रंथकर्त्यांचा मराठी भाषा शास्त्राचा अभ्यास बराच कमी असल्यामुळें व्याकरण विषयक चुका बऱ्याच आहेत. त्या थोडयाशा प्रयत्नानें नाहींशा होण्यासारख्या आहेत.

शेवटीं, वाग्विलास मंडळानें हातीं घेतलेल्या प्रकाशनाच्या कार्यांत सर्व वाङ्मयप्रेमी लोकांनी हातभार लावून तिला यशस्वी करण्याचें श्रेय घ्यावें अशी विनंति करून व सर्व सहकाऱ्यांचे आभार मानून ही प्रस्तावना संपवितों.

व्यवस्थापक,

आश्विन शु॥ १ श. १८६२ }
हैद्राबाद द. }

प्रकाशन विभाग
वाग्विलास मंडळ



# प्रास्ताविक

महाराष्ट्रांतील इतर भागांच्या मानानें मराठवाड्यांतील गद्य वाङ्मय अत्यल्प आहे हें नाकबूल करतां येत नाहीं. या वाङ्मयाला सुरवातही फार उशीरा म्हणजे या शतकाच्या सुरवातीस झाली. तेव्हांपासून आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या गद्य पुस्तकांची यादीहि शेपन्नासच्या आंतच भरेल. याला कारणें ही बरीच आहेत. एक तर सबंध महाराष्ट्राशी या बाबतींत तुलना करतां येत नाही. कारण मराठवाडा हा क्षेत्रफळ व लोकसंख्येच्या दृष्टीनें महाराष्ट्राच्या एक पंचमांश आहे व त्या प्रमाणांतच येथील वाङ्मयनिर्मिती पाहिली पाहिजे. दुसरें कारण असें कीं, गद्य लेखनाचा प्रकार हा आधुनिक शिक्षणपद्धतीला सुरवात झाल्यावर रूढ झाला. यापूर्वी गद्य वाङ्मय नव्हतें असें नाहीं. बखरी, पत्रें, व साधुसंतांच्या हकीकती इत्यादि गद्य वाङ्मय पूर्वीं अस्तित्वांत होतें. महानुभवांचें गद्य वाङ्मय, निरनिराळ्या बखरी, योद्धे व मुत्सद्दी यांनीं लिहिलेलीं निरनिराळीं पत्रें, नाना फडणीसांचें आत्मचरित्र वगैरे गद्य वाङ्मयाचें उदाहरण देतां येईल. पण मध्ययुगीन वाङ्मयाचें वैशिष्ट्य पद्यांत होतें. गद्यांत नव्हें व त्या दृष्टीनें गद्य वाङ्मयाची व त्याचे

मुख्य प्रकार म्हणजे ललित वाङ्मय याची वाढ गेल्या शे दीडशे वर्षांतच झाली जर महाराष्ट्रांत ही स्थिति, तर मराठवाड्यांत गद्य लिखाणाला सुरवात एकोणीसाव्या शतकाच्या अखेरीस झाली असल्यास काय नवल? महाराष्ट्र व मराठवाडा या मधले दळणवळण साधारणपणें इ. स १८०० पासून १८७५ पर्यंत कमी झालें होतें, तें पुन्हां रेल्वेच्या सोयीमुळे सुरू झाले. व इ. स. १८६० नंतर महाराष्ट्रांतील बरीच मंडळी इकडे येऊन स्थायिक होऊं लागली. या मंडळींनी आपल्याबरोबर महाराष्ट्रांतील नव्या घडीची कल्पना आणिली. गद्य वाङ्मयांतील पहिले वाङ्मय सेवक पुरुषोत्तमपंत बोडस, व पंडित इत्यादि मंडळी या पैकीच होत अर्थात यापूर्वी गद्य वाङ्मय लिहिलें गेलें नाहीं असें नव्हे श्री हंसराज स्वामींनी (जन्म १७९८ परभणी व मृत्यु १८५५ परंडा) गद्यरूप तत्वझाडा म्हणून एक ग्रंथ लिहून ठेविला आहे तो अद्याप प्रकाशित झाला नाहीं. पण स्थूल मानानें पाहतां आपल्या येथें गद्य वाङ्मयाला खरी सुरवात चाळीस पन्नास वर्षांपूर्वी झाली हें निःसंशय होय. ज्या प्रमाणें तिकडून इकडे येऊन स्थायिक झालेल्या मंडळींत पंडित, बोडस, फाटक, केळकर, भिडे, पाटील, अत्रे ही मंडळी होतीं त्याप्रमाणें महाराष्ट्रांतील शिक्षण संस्थांचा फायदा घेण्याच्या निमित्तानें इकडून बरीच मंडळी तिकडे गेली व व्यवसायानिमित्त जाऊन तिकडे स्थायिक झाली. "माझे रामायण" कर्ते दत्तो अप्पाजी तुळजापूरकर याचें नांव या बाबतींत घेतां येईल. या शतकाच्या सुरवातीस मराठवाड्यांतून बरीच मंडळी पुण्यामुंबईकडे किंवा नागपूरउमरावतीकडे शिकण्याच्या निमित्तानें गेली होती व त्यानी परत येतांना नवीन कल्पना, नवीन विचार व नवीन ध्येयें बरोबर आणलीं. मराठवाड्यांतील कोणत्याहि मोठ्या शहरांत आपल्याला निरनिराळ्या व्यवसायांत पडलेली अशी मंडळी आढळतील कीं, ज्यांचें कॉलेजशिक्षण फर्ग्युसन कॉलेज किंवा अशा पुण्या मुंबईकडच्या कॉलेजांत झालें आहे. पण गंमत अशी कीं, या मंडळीनीं मराठवाड्यांत आधुनिकपणाचें वारें खेळविलें व इकडील लोकांसमोर पुण्या मुंबईकडचें चित्र ठेवून त्यांच्यांत नवयुगाविषयीं कुतूहल निर्माण केलें एवढेच. प्रत्यक्ष वाङ्मय

कार्यांत यापैकीं फारच थोडी मंडळी पडली. गेल्या वीस पंचवीस वर्षांत जी गद्य वाङ्मय निर्मिती झाली आहे तिचा बराचसा वाटा इकडील मुल्की लोकांतील विनयदवीधर व बाहेर ज्यांचे शिक्षण झालें नाहीं, अशाच लोकांकडे जातो. लेखकांची जी नांवें सहज डोळ्यासमोर आलीं त्यांची यादी खाली देत आहे.

| | | रा. | ग्रंथ |
|---|---|---|---|
| (१) | दत्तात्रय माधव कुळकर्णी वकील | तुळजापूर | तुळजापूर वर्णन व इतर भाषांतरित कादंबऱ्या. |
| (२) | नारायणराव पेशवे वकील | ,, | भाषांतरित पुस्तकें |
| (३) | गणपतराव पेशवे वकील | ,, | ,, ,, |
| (४) | मोतीलाल हीराचंद गांधी | उस्मानाबाद | महावीर चरित्र व इतर जैन वाङ्मय |
| (५) | भगवंत गोविंद तोडेवाले | अंबेजोगाई | पैगंबर चरित्र व इतर ग्रंथ |
| (६) | वामन दामोदर गाडगीळ | निजामाबाद | फिरस्त्याचे निवडक लेख |
| (७) | यशवंत सदाशिव कोरेकल | हैदराबाद | विचारवैभव, यशोविलास, किरण कौस्तुभ |
| (८) | वाळुजकर | ,, | राजा रामरायांच्या घराण्याचा इतिहास |
| (९) | रामचंद्रराव काटे | सेलू (परभणी) | भूषणाचें मराठी भाषांतर |

| | | | |
|---|---|---|---|
| (१०) | धारवाडकर | गुलबर्गा | सत्यज्ञानतीर्थ चरित्र व भारत तात्पर्य-निर्णयाचें मराठी भाषांतर |
| (११) | विश्वेश्वर अंबादास कानोले | नांदेड | गुरु गोविंदसिंह चरित्र |
| (१२) | दत्तात्रय अनंत सराफ | नांदेड | तुळाराम चरित्र व इतर पुस्तकें |
| (१३) | अत्रे | हैदराबाद | प्रेमचंदाच्या गोष्टींचे अनुवाद |
| (१४) | भगवान रघुनाथ कुळकर्णी | परभणी | ओऽ कादंबरी |
| (१५) | का. सी. वैद्य | हैदराबाद | कोरटकर चरित्र |
| (१६) | कृष्णाकुमार एम. ए. | गुलबर्गा | उषा, अलकनंदा व मराठवाड्यांतील आधुनिक कविता |
| (१७) | दिवाकर कृष्ण केळकर | हैदराबाद | किशोरीचें हृदय, तोड ही माळ व समाधि व इतर सहा लघुकथा |
| (१८) | ब्रह्मपुरीकर | गंगाखेड | मदनिका कादंबरी |
| (१९) | सौ. किर्लोस्कर | हैदराबाद | माझा भाई |
| (२०) | कुळकर्णी | ,, | माणिक प्रभू |

वरील नांवें सहज सुचलीं तीं दिली आहेत. यावरून वरील लेखकांत पदवीधर मंडळी किती कमी आहेत तें समजून येईल. या पैकीं बऱ्याच मंडळींना लेखनस्फूर्ति मराठवाड्याबाहेरील शालेय व कॉलेज शिक्षणांतून झाली नाहीं. पण महाराष्ट्राशीं वाढतें वळणवळण, तिकडील लोकांची येजा,

मासिकें वृत्तपत्रें इत्यादींची तिकडून इकडे होणारी आयात व त्यांतून इकडील लेखकांना देण्यांत आलेल्या सोयी यामुळें हे लेखक वाङमयांत पडले व हळूहळू वाङमय निर्मिति होऊं लागली.

वरील विवेचनावरून पाहतां इकडील लेखकांचे एकंदरीत तीन गट पडतात, (१) बाहेरून येऊन इकडे स्थानिक झालेले, (२) इकडून जाऊन बाहेर स्थानिक झालेले, (३) इकडील मुल्की लेखकांपैकीं, (अ) बाहेरील शिक्षण घेऊन परत इकडे आलेले, (ब) इकडील विश्वविद्यालयीन शिक्षण घेतलेले, (क) पदवीधर नसलेले इकडील लेखक. अलीकडे दहा पांच वर्षांत पुढे येत असलेले लेखक म्हणजे (१) बी. रघुनाथ, (२) डॉ. भाले, धर्माबाद (३) जोशी, धर्माबाद, (४) बालशंकर देशपांडे, (५) सौ. उषाबाई पगडी (६) सौ. सुशीलाबाई फाटक वगैरे मंडळी होत.

अर्थातच इकडील गद्यवाङमय अद्याप अत्यल्प आहे यांत शंकाच नाहीं. तरी पण त्यांतल्या त्यांत इकडील लेखक मंडळी मार्ग काढीत आहे. होतकरू लेखकाना पुढें आणण्याकरितां एखादें मासिक नाहीं या मुळें बऱ्याच लोकांचें बरेचसें लिखाण पडून आहे. बाहेरील मंडळींनीं अलीकडे लिहिलेल्या पुस्तकांत श्री. जोशी यांचे मराठवाड्यांतील अर्वाचीन कवितेचा साद्यंत इतिहास देणारे अर्वाचीन मराठी वाङमय या पुस्तकाचा उल्लेख केल्याशिवाय राहवत नाहीं. बाकी परप्रांतीय लेखकांचे मराठवाड्याविषयींचे उल्लेख हे बरेचसें अज्ञान व गैरसमजूतीवर आधारलेले असतात. या विषयीं साधारण चर्चा पुस्तकांत अन्यत्र केली आहे. पण इकडील आधीच अल्प असलेल्या गद्य वाङमयांत प्रादेशिक वैशिष्ठ्याचा अभाव जाणवतो. इकडील सामाजिक व सांस्कृतिक प्रश्न, इकडील इतिहास, इकडील मान्यवर व्यक्ति, इकडील योद्धे व मुत्सद्दी, व इकडील बहुजन समाज यांचें चित्र आमच्या वाङमयांत कां येऊं नये? यानें मराठी वाङमयांतील एका रमणीय विभागाची स्थापना होऊन कोंकण, गोमंतक, विदर्भ, गोंडवन इत्यादि बरोबर मराठवाड्यांतील प्रादेशिक वाङमयामुळें मराठी वाङमयांत विविधता येईल. अर्थात इकडील सबंच

लेखक या बाबतींत दोषी आहेत असें म्हणावयाचें नाहीं. गाडगीळ, भिडे, कानोले, कुळकर्णी, वैद्य, कोरेकल इत्यादींच्या लेखनांतून प्रादेशिकपणा दिसून आल्यावांचून राहात नाहीं. आमच्या इकडील लेखकांपैकीं महाराष्ट्रांत प्रसिद्ध असलेली मंडळी म्हणजे दिवाकर कृष्ण केळकर, दत्तो अप्पाजी तुळजापुरकर, वामन दामोदर गाडगीळ उर्फ फिरस्ते, यशवंत सदाशिव कोरेकल, इत्यादि होत. अर्थात् गद्य लेखकाविषयींच हें विधान आहे. कवी मंडळांत कान, कोरेकल, व महाजन यांची नांवें महाराष्ट्रांत बऱ्याच लोकांच्या माहितीची झाली आहेत. बेबी नाटिकेचे कर्ते श्रीपाद नृसिंह बेडे हे परभणी जिल्ह्यांतील पाथरीचे राहणारे, त्यांचें नांव कांही दिवस गाजलें होतें.

तरी एकंदरीत पाहतां आमच्याकडे गद्य वाङ्मयाची निर्मिती झपाट्यानें होत नाहीं हें निर्विवाद आहे. याला माझ्या मतें परिस्थिति कारण नसून आमचा आळस व निष्क्रीयपणा कारण आहे, यांत संशय नाहीं. याचें प्रत्यंतर जी मंडळी वाङ्मय व्यवसायांत पडली आहेत त्यांचेंच उदाहरण घेतल्यानें समजून येईल. सध्यां आहेत ती मंडळी प्रसन्न मनानें लेखन करीत आहेत तर इतरांनीं कां करूं नये? अलीकडे या बाबतींत काहीं तरी कार्य झालें पाहिजे असें सुज्ञांना वाटूं लागलें आहे. परभणीला कुळकर्णी यानीं प्रकाशनाची योजना हातीं घेतली आहे व 'दीप' नांवाचा लघुकथासंग्रह प्रसिद्ध करण्यांत करण्यांत आला आहे. हैदराबाद येथे मराठवाडा मनोरंजक ग्रंथ प्रसारक-मंडळ, नांवाचें मंडळ स्थापन झालें असून त्यांच्यातर्फे 'अलक नंदा' हा लघुकथा संग्रह प्रसिद्ध झाला आहे. परंड्याच्या श्रीहंस मंडळानें हंसराज स्वामीचे सर्व ग्रंथ प्रकाशित करण्याचा संकल्प केला असून गेल्या वैशाखांत 'आगमसार' हा वेदांतपर ग्रंथ छापून प्रकाशित केला आहे. औरंगाबादकर मंडळी प्रातिनिधिक कविता संग्रह प्रकाशित करण्याच्या मागें लागलीं आहेत. हैद्राबाद येथें मधून मधून चांदरातींतील डोहाळ जेवणें होत आहेत, व लवकर बाळसेदार वाङ्मयापत्यांचा लाभ मराठवाड्याला होईल असें सुचवीत आहेत. पण सर्व लेखकांना एका ठिकाणीं आणणारी मध्यवर्ती

संस्था असणें आवश्यक आहे. व्यापक प्रमाणावर प्रकाशनाची योजना झाली पाहिजे. तसेंच आमच्या इकडील पदवीधर लोकांनीं निष्क्रीयतेंत पडून न राहतां वाङ्मयनिर्मितीकडे लक्ष दिलें पाहिजे. रसिक वाचक, लेखक व धनिक एकत्र आल्यावर वाङ्मयाचें पाऊल झपाट्यानें पुढें पडल्याशिवाय रहाणार नाहीं. असें घडून येऊन महाराष्ट्राच्या वाङ्मयीन नकाशावर लवकरच मराठवाड्याचें नांव ठळकपणें लिहिलें जाईल अशी आशा बाळगण्यास काय हरकत आहे?

१-९-१९४० कृष्णाकुमार एम. ए.

---

# डॉ. वामन दामोधर गाडगीळ.

फिरस्त्यांचा " खुसखुशीत मेवा " इ. स. १९३४ मध्यें प्रसिद्ध झाला नि त्याच सुमारास तो मला चाखावयास मिळाला. त्या गोष्टीला आज पांच वर्षे होत आलीं पण फिरस्त्याचे लेख कितीदा वाचले तरी त्यांची गोडी कांहीं कमी होत नाहीं आणि त्यांच्या लिखाणानें माझ्या सारख्या नवशिक्या वाचकालाच चटका लाविला आहे असें नव्हे तर अत्र्यांच्या सारख्या सुप्रसिद्ध साहित्यिकांच्या तोंडून ' फिरस्ते ' हे मराठी साहित्यांतून फेरफटके मारणारे कांहीं नवखे मुशाफर नव्हेत असे उद्‌गार काढावयास लाविले आहेत. फिरस्त्यांचे लेख निरनिराळ्या विषयांवर आहेत. स्थानिक वृत्तपत्रांतून अद्यापपर्यंत त्यांची वाङ्मय सेवा चालू आहे कधी हैदराबाद ते लाहोरच्या प्रवासावर वाचकांना ते घेऊन जातील, कधीं साप्ताहिक समालोचन करून ते वाचकांस जगांतील घडामोडी अवलोकावयास लावितील तर कधी प्रचलित सामाजिक विषयावर आपलीं मतें लिहून येथील समाजांत लहानशी खळबळ उडवून देतील. त्यांचे अगदी अलीकडील लेख सुद्धां त्यांची विनोदबुद्धि पूर्वी इतकीच ताजी व वैशिष्ट्यपूर्ण असल्याचा निर्वाळा देतात.

फिरस्त्यांच्या लिखाणांत इतकी गोडी उत्पन्न होण्यामागचें काय आहे ? त्यांच्या विषयांची निवड कां त्याचें सूक्ष्म निरीक्षण ? कां त्यांची कसलेली भाषा कां शैली कां त्यांचा विनोद ? या सर्वांपैकी कोणत्या गोष्टींना महत्व द्यावें लागेल हे प्रश्न तावडतोब मनांत उभे राहतात नि स्पष्टीकरण मागतात.

फिरस्त्याचें वय आज साठाच्या वर आहे. त्यांची अविरत वाङ्मय-सेवा गेल्या वीस वर्षांपासून सारखी चालू आहे. त्यांचें लिखाण जरी उशीरा प्रसिद्ध झालें तरी वयानें ते मराठवाड्यांतील आधुनिक वाङमय सेवकांना गुरुस्थानी शोभतील प्रस्तुत लेख संग्रहांत फिरस्त्याचे एकंदरीत तेवीस लेख समाविष्ट केले आहेत. त्यांपैकी पांच धार्मिक व सामाजिक विषयांवर, पंधरा विनोदी नि उपरोधिक विषयांवर व तीन प्रवास वर्णनपर असे आहेत. या संग्रहांतील मुख्य गाभा जरी विनोदी लेखाचा असला तरी धार्मिक, सामाजिक नि प्रवास वर्णनपर लेख या संग्रहांत समाविष्ट करावयास नको होते असें वाटल्यावाचून राहवत नाहीं कारण फिरस्त्यांचें लिखाण विनोदी असतें अशी एकदां खात्री किंवा असा लौकिक झाल्यावर वाचकांची दृष्टि इतर लिखाणा-कडे न वळतां सरळ त्यांच्या विनोदी लेखाकडे वळते. त्यांचे इतर विषयां-वरील लेख स्वतंत्र रीतीनें छापले असते तर वाचकांना तिकडे लक्ष द्यावे लागले असते. लेखकाच्या बाबतींत हा अन्याय झाला आहे असें मला वाटतें. कारण विनोदी लेखाइतकीच त्यांच्या इतर विषयांवरील लेखांची योग्यता आहे.

धार्मिक व सामाजिक लेखांचे विषय फिरस्त्यांच्या मनोवृत्तीवर प्रकाश पाडतात. 'मूर्तिपूजेची मीमांसा', 'भुवासबंधी कांहीं विचार', 'आमचे राष्ट्रीय दुर्गुण', 'आमचे संस्कार,' 'नाकयज्ञसंस्था व हविर्यज्ञ संस्था' व 'सीमोल्लंघन' हे ते विषय होत. लेखाच्या निवडीवरून फिरस्ते हे साधारणपणें जुन्या धार्मिक मताचे, विचारप्रिय, जुन्या व नामशेष होणाऱ्या संस्थाबद्दल हळहळ करणारे, राष्ट्रीय अधःपतनाबद्दल खेद बाळगणारे तळमळीचे लेखक असावेत अशी कल्पना करता येण्यासारखी आहे.

' मूतिपूजेची मीमांसा ' या विचार प्रवर्तक निबंधांत फिरस्त्यांनीं मूर्तिपूजेची खालील प्रकारें मीमांसा करून त्याची आवश्यकता प्रतिपादिली आहे.

( १ ) परमेश्वराचे स्वरूप म्हणजे निराकार, अव्यक्त, अनंत, सर्वव्यापी, निर्गुण असें आहे. पण ही थियरी झाली. पण याचा फायदा व्यावहारिक दृष्टीनें करून घ्यावयाचा असला म्हणजे प्रतीकाची आवश्यकता उत्पन्न होते.

( २ ) जीव ब्रम्हैक्य हें परमध्येय आहे आणि त्याला मनाची एकाग्रता हेंच परम साधन होय आणि एकाग्रता साधण्यास प्रतीक असणें हें आवश्यक आहे. कारण अव्यक्ताचे ठिकाणी चित्ताची एकाग्रता करूं पाहणारास फार कष्ट होतात. निर्गुण ब्रह्मांत विलीन होणें हें अखेरचें साध्य आहे. हें साध्य प्राप्त होण्यास सगुण व साकार मूर्तीची श्रद्धा व भक्तीपूर्वक उपासना करणें हेंच साधन आहे.

( ३ ) काव्य उपासनेसंबंधीं दोन शंका उत्पन्न होतात. ईश्वर आपल्या प्रार्थनेनें व स्तुतीनें प्रसन्न कां व्हावा व जरी प्रसन्न झाला तरी तो आम्हाला कशी मदत करतो ?

याला फिरस्ते उत्तर देतात की संचितप्रमाणें मनुष्याला कर्मफल भोगणें आवश्यक आहे पण प्रत्येक जन्मांत तो नवीन कर्में करतो, हीं कर्में बुद्धीच्या प्रेरणेमुळे होतात व या प्रेरणा चांगल्या असल्या म्हणजे मोक्षाचा मार्ग मोकळा होतो. ज्ञान व मोक्ष हे एकच आहेत. देहेंद्रियांच्या कोंडींत सांपडलेल्या जीवात्म्याशीं आपल्याच अंशाची सुटका करणाऱ्या अशा मोक्षानुकूल प्रेरणा तो बुद्धीस करतो व तो अशा रीतीनें आपल्याला मदत करतो.

मूतिपूजेची आवश्यकता फिरस्त्यांनी अशा रीतीनें प्रतिपादिली आहे. तार्किक पद्धतीनें मीमांसा फार उत्कृष्ट रीतीनें केली गेली आहे याबद्दल वाद नाहीं. निव्वळ तात्विक दृष्टीनें मूर्तिपूजेबद्दल कुणांत दुमत होईल असें ही नाही. Clear thinking म्हणजे स्पष्ट व सुसंबद्ध विचार हा फिरस्त्यांच्या

लेखांचा एक मोठा गुण आहे. पण त्यांचे विवेचनांतील मुद्दे विवाद्य नाहींत असें नाहीं प्रथम आक्षेप हा की, फिरस्त्यांच्या विचारसरणीवर शांकरप्रणीत अद्वैत मताची छाप पडली आहे. जीव ब्रम्हैक्य हें परम ध्येय असें ते मानतात; पण द्वैत मतानुयायांच्या दृष्टीनें जीव ब्रम्हैक्य हें ध्येय ठरूं शकत नाही. समीपता हें ध्येय आहे. विलीन होणें हें नाहीं व या मताची छाप समाजांतील बऱ्याच लोकांवर आहे हें विसरून चालायचें नाही. दुसरें असें कीं मूर्तिपूजेचें तत्व प्रतिपादितांना ईश्वरांत विलीन होणें हें ध्येय व मनाची एकाग्रता हें साधन फिरस्त्यांनी गृहीत धरलें आहे. पण निरनिराळ्या उपास्य दैवतांच्या बुजबुजाटांत परमेश्वराचें एकमेवाद्वितीयत्व लोपून गेल्यासारखें झालें आहे त्याची काय वाट ? मूर्तिपूजेचा उपयोग मन एकाग्र करण्याकडे होतो हे मानल्यावर निरनिराळ्या उपास्य दैवताच्या मूर्ती डोळ्यासमोर आल्याच आणि शहाण्यांना जरी एका परमेश्वराची कल्पना पटली तरी अज्ञलोकांत तरी ही कल्पना जवळ जवळ लोप पावली आहे हें नाकबूल करून चालणार नाहीं. शिवाय मन एकाग्र करणें ही क्रिया वैयक्तिक आहे आणि व्यक्ती तितकीं उपास्य दैवतें हें एकदां गृहीत धरल्यावर समष्टि धर्म कुठे शिल्लक राहिला ? म्हणून वैयक्तिक मोक्ष साधनाकरितां प्रतीकाचें मनन व पूजन हें केव्हांहि मान्य असलें तरी प्रत्यक्ष व्यवहारांत मूर्तिपूजेचा परिणाम समष्टि धर्माकडे लोकांना न ओढतां व्यक्तिनिष्ठतेकडे ओढण्याकडे झाला हें स्वत: फिरस्तेच कबूल करतील. अर्थात त्यांच्या मीमांसेंत दोष नाहींत. फक्त त्यांच्या परिणामाची एक बाजू दाखविली. त्यांनीं मूर्तिपूजेची मीमांसा व्यवर्ताच्या दृष्टीनें केली हें उघड आहे. प्रकृति, परमात्मा, बुद्धि, पुनर्जन्म वगैरे विषयींचे त्याचे विचार स्पष्ट व भरीव आहेत नि ते गाढ अभ्यासावर आधारलेले आहेत फिरस्त्यांचा दुसरा निबंध ' सुखा ' वर आहे. यांत सुद्धां त्यांची सरळ व तार्किक पद्धत दिसून येते. कोणतेंही विधान प्रमेयाशिवाय करायचें नाहीं. प्रत्येक विधान आधार पाहूनच करायचें, मूळ मुद्याकडे वळतांना पाल्हाळ लावायचा नाहीं हें त्यांच्या धार्मिक नि सामाजिक निबंधाचें वैशिष्ट्य होय. त्यांचे सुखासंबंधीं कांहीं विचार सुद्धां असेच मननीय आहेत.

सुखाची व्याख्या ठरवितांना फिरस्ते म्हणतात " मनाच्या इच्छा तृप्त झाल्या म्हणजे मनास जी अनुकूल संवेदना प्राप्त होते त्यासच ' सुख ' म्हणतां येईल. ह्याचा अर्थ असा कीं, सुखाचा भोक्ता मनच आहे. " मनाला हें सुख दोन साधनांनीं मिळतें. एक इंद्रियजन्य व दुसरें बुद्धिजन्य. इंद्रियांना विशिष्ट पदार्थांपासून सुख व विशिष्ट पदार्थांपासून दुःख होण्याचें कारण फिरस्त्यांच्या मतें वस्तू वस्तूंमध्यें नैसर्गिक असें कमी जास्त आकर्षण असतें हेंच होय. इंद्रियद्वारा होणाऱ्या सुखापेक्षां बुद्धिद्वारा होणारें सुख सूक्ष्म, विविध व जास्त शाश्वत असतें. म्हणून तें श्रेष्ठ प्रतीचें असतें. हें सुख प्राप्त करून घेण्याकरितां कधीं कधीं इद्रिय सुख टाळावें लागतें. सुखाचा लाभ खरा व शाश्वत सुखाचा लाभ सर्व जगाला कसा मिळेल याचा विचार करण्याकरितांच समाजशास्त्र, नीतिशास्त्र, धर्मशास्त्रें वगैरे उदयास आलीं आहेत. दुःख नाश म्हणजेच सुख असें नसून सुखाच्या वेदना स्वतंत्र आहेत. हें सिद्ध करून फिरस्ते, पदार्थ हा स्वार्थाचाच पर्याय आहे, या विधानांचा विचार करतांना म्हणतात कीं, हे विधान सर्वांशीं खरें असूं शकत नाहीं. स्वसुख निरपेक्ष अशी दया अगर परोपकार मनुष्याच्या अंतःकरणांत उत्पन्नच होऊ शकत नाही काय ? अर्थात् अशा भावना होऊं शकतात व इतरांना सुख होण्याकरिता सर्वस्वाचा त्याग करणारे महात्मे पण असूं शकतात. आणि त्यांना जे सुख होतें तें आत्म्याचें सुख म्हणतां येईल. या आत्म्याचें स्वरूप आनंदमय म्हणजे सुखमयच आहे. सुख आत्म्यांतच आहे. बाहेरच्या वस्तूंत सुख नाहीं. हें सुख दिसण्यास ज्ञान पाहिजे इंद्रिय सुख, मनाचें सुख, बुद्धीचें सुख व शेवटीं आत्म्याचें सुख अशा सुखांच्या पायऱ्या फिरस्त्यांनीं दाखविल्या आहेत. पण दुःख-नाश म्हणजेच सुख, सुखाच्या स्वतंत्र संवेदना नाहींत, इच्छा करण्यानें दुःख होतें व क्षणिक सुख वाटलें तरी परिणामी दुःखच, सबब इच्छा मारण्यांत व संसार त्यागांतच खरें सुख आहे या तत्वावर निवृत्ति मार्गाची इमारत उभारली आहे व याचाच अपरोक्ष परिणाम आपल्या गुलामगिरींत दृगोचर झाला आहे असें फिरस्ते म्हणतात. सुख नाहींच असें म्हणतां येत नाहीं. सुख हें हवें आहे पण तें उच्च प्रकारचें म्हणजे आत्मिक सुख पाहिजे आणि हें सुख आत्म्याच्या दृष्टीनें

सर्व प्राणिमात्राकडे पाहून त्यांचें सुख वाढविण्याचा अहर्निश प्रयत्न करण्यानेंच प्राप्त होतें. याचा आम्हाला विसर पडला. आम्ही वैयक्तिक मोक्षाकडे लागलों, समाजकार्य विसरलों यामुळेच आमची अवनति झाली आहे असा फिरस्ते निष्कर्ष काढतात.

फिरस्त्याचा हा लेख चिंत्य व मननीय आहे. उच्च सदभिरुचि, उत्कृष्ठ तर्कपद्धति व मूळांत जाऊन अवनतीचीं कारणें शोधून काढण्याची तळमळ या लेखांत दिसून येते. सद्यःपरिस्थितीत त्यांची सुखाची मीमांसा समाजाला किती तरी उत्कृष्ट रीतीनें मार्गदर्शक होऊं शकेल. पण या उत्कृष्ट निबंधाला विनोदी लेखाच्या जोडीला बसविल्यामुळें रसहानी बरोबर लेखकावर केवढा अन्याय झाला आहे याची संपादकांना कल्पना आलेली दिसत नाहीं. असो. मूर्तिपूजेची मीमांसा करतांना सुखावर सुचलेल्या विचारांचा निष्कर्ष फिरस्त्यानीं ध्यानांत घेतला असतां व ज्या समष्टि धर्माचा त्यांनीं जोमानें पुरस्कार केला आहे त्या समष्टि धर्मावर मूर्तिपूजेचा काय परिणाम झाला आहे याचा विचार केला असतां तर त्याच्या मूर्तिपूजच्या मीमांसेचें स्वरूप बरेचसें बदललें असतें याची खात्री वाटते व त्याचे पुढील लेख पाहिले तर आपल्या विधानाला पुष्टि येते. ‘ आमचें राष्ट्रीय दुर्गुण ’ या निबंधांत त्यांनीं आपल्या सामाजिक दुर्गुणाची प्रखर चर्चा केली आहे. भिडस्तपणा, यांत्रिकपणा, नीतिधैर्याचा पूर्ण अभाव इत्यादि दोष आपल्याला चिकटले आहेत म्हणून आपल्या हातून कोणतींच कार्यें होत नाहींत व आपला अधःपात होतो असें त्यांनीं बजावलें आहे. या दुर्गुणाबरोबरच त्यांनीं समष्टि वरील आपल्या निबंधांत त्याची तळमळ फार उत्कटतेनें व्यक्त केली आहे. फिरस्त्यांच्या लिखाणांत दुराग्रहीपणा नाहींच. जें कांहीं तें सांगतील ते सरळपणें वाटेल त्या गोष्टींत ते आवेश आणीत नाहींत. किंबहुना शांतपणा व संयम हा त्यांच्या लिखाणाचा विशेष आहे. यामुळें त्यांचीं वाक्यें लहान पण अर्थवाहक असतात. उगा अधिक शब्द सांपडायचा नाहीं, भलताच पाल्हाळ नाहीं. प्रत्येक वाक्य म्हणजे विचारौघाला पुढें नेणारें साधन आहे. पण कधीं कधीं तळमळ जास्त झाली तर लहान लहान वाक्यें त्यांना अपुरी

पडतात व त्यांच्या भाषेचा ओघ शांतपणाच्या मर्यादा ओलांडून बाहेर पडतो.

खालील उदाहरण पहा!

"तात्पर्य आमच्या स्त्रियांची दृष्टि चूल व मूल यांतून निघून जेव्हां देश व लोक याकडे वळेल, आमच्या विद्यार्थ्यांची दृष्टि हिमालय पर्वत, अरबी समुद्र व पॅसिफिक महासागर या सर्वांना ओलांडून जेव्हा परदेशाकडे लागेल, आमच्या कवींची दृष्टि रमणी किंवा फूल यांतून निघून जेव्हा वीररसानें ओथंबलेल्या देशाभिमानाच्या काव्याकडे वळेल, आमच्या मुत्सद्यांच्या दृष्टीचें क्षितिज आपल्या पार्टीच्या विजयांतच मर्यादित झालें आहे तें जेव्हां राष्ट्राच्या विजयाची इच्छा करण्याइतपत विस्तृत होईल, आमचे शिपाई, पायदळ व घोडेस्वार होण्यांतच पुरुषार्थ समजतात, त्या ऐवजी सेनानी व सेनानायक होण्याची त्यांच्यांत जेव्हां महत्वाकांक्षा उत्पन्न होईल. आमचे नावाडी लहानशा नदींतून लहान होडी वल्हविण्यांतच आनंद मानतात त्या ऐवजीं मोठमोठालीं गलबतें चालविण्याची त्यांच्यांत जेव्हा शक्ति येईल. आमचे शिल्पकार मोडलेल्या मशिनरी दुरुस्त करणेंच कौशल्याचे समजतात त्यापेक्षां त्यांची बुद्धि जेव्हां नवीन नवीन मशिनरी उत्पन्न करण्याकडे धावूं लागेल, आमचे धर्मशास्त्री जून्या धर्मशास्त्रांची लटपट सोडून देशकालपरत्वें जेव्हां हिंदुधर्माला सर्व संग्राहक व सजीव करूं लागतील, एकेकटे ईश्वर भजन करण्यापेक्षां इस्लाम अथवा ख्रिस्ती ह्याप्रमाणें आम्ही जेव्हां सर्व मिळून ईश्वर प्रार्थना करण्याचें शिकूं तेव्हांच तें खरें सीमोल्लघन होईल."

धार्मिक व सामाजिक लेखांतील तळमळ ज्या उत्कटतेंतून निर्माण झाली आहे, ती उत्कटता फिरस्त्यांच्या प्रवासवर्णनपर लेखांमधूनही दिसून येते. अशावेळीं त्यांचें लिखाण काव्याच्या पंक्तीला जाऊन बसते व वाचतांना आपण एखादें गद्यकाव्य तर वाचीत नाहींना असें सारखें वाटतें. गिरसप्पाच्या धबधब्याकडे पाहून ते म्हणतात,

"हे शरावती! आपल्या प्रियकर रत्नाकराला भेटण्यासाठीं तूं केवढे

हे साहस केलेंस ? अगे ९९० फुटांच्या कड्यावरून खाली उडी घेणें म्हणजे केवढें साहस ! प्रेमापुढे जिवाची तूं पर्वा केली नाहींस ! परंतु समुद्राला त्याचें कांहीं आहे काय ? इतक्या उंचावरून उड्या मारून लगबगीनें शरावतीनें आपणास अलिंगन दिलें ह्याचें महत्व त्या चवचाल समुद्रास कांहीं तरी आहे काय ? तुझ्या एवढ्या प्रेमाचें त्यानें काय चीज केलें ? शरावती, समुद्र तुझ्या प्रेमाला समजो अथवा न समजो परंतु प्रेमासाठी तूं केलेलें हें साहस सर्व जगाच्या आनंदाचा व सौख्याचा विषय झालेलें आहे ह्यांत मात्र संशय नाही ! आतां समजलें. तुझा तो धो धो आवाज विलापक नसून येवढी उडी घेऊन प्रियकराची भेट घेतां आली म्हणून तुझा तो आनंदच आहे ! तुझ्या ह्या लग्नासाठी तो सहस्त्र रश्मिकर हा बघ तुला केवढा आहेर आणीत आहे ! केवढा भारी रंगीबेरंगी व जरीचा शालू त्यानें तुला आणला आहे !"

वरील उतारा वाचकांस जरा मोठा वाटेल पण फिरस्त्यांच्या शैलीचें वैशिष्ठ्य ध्यानी येण्याकरितां तो उतारा देणें अवश्य आहे. सामाजिक लेखांत त्यांचा आवेश लांबलांब पक्तीतून व्यक्त करावा लागतो पण काव्यमय दृश्याचें वर्णन करतांना त्यांचीं वाक्यें तुटक होत जातात व काव्यमय बनत जातात. भाषा अलंकारमय बनते व शब्दही नटवे व काव्यपूर्ण बनतात. फिरस्त्यांच्या विचारांत दुर्बोधता नाहीं व शब्द साधे, सोपे नि अर्थवाहक. असतात दीर्घ व्यासंगाशिवाय हें शक्य नाही.

प्रवासवर्णनपर लेखांत निरीक्षणाची सूक्ष्मता दिसून येते तशीच उपमा देतांनाही योजण्यांत आलेलें वैशिष्ठ्य डोळयांत चटकन् भरतें. साधें वर्णन करतांना ते उपमा अलंकारादिकांच्या भरीस पडत नाहींत. त्यामुळें लांबलांब वर्णनें वाचतांना त्यांचा अभाव जाणवतो पण कधीं कधी एकच उपमा इतकी मनोरम व उचित वाटते कीं, मन प्रसन्न होऊन जावें. गिरसप्पाच्या प्रवाशांच्या बंगल्याकडे पाहून ते म्हणतात,

"पर्वताची पांच सहा शिखरें व सभोंवतालीं दाट झाडी आणि

मध्यभागीं हा बंगला ह्यांकडे पाहिले म्हणजे गणपति मखरांत बसवावा त्याप्रमाणें म्हैसूर सरकारचा बंगला अत्यंत शोभायमान दिसतो." तसेंच 'पंढरपूर' वरील लेखांत,

"चंद्रभागा नदी पंढरपूर क्षेत्राच्या गळ्यांत अडकवलेली मोठ्या चांदीच्या सरीसारखी दिसली." अशा उपमा मधून मधून पसरलेल्या दिसतात. महाबळेश्वरीं आढळणाऱ्या रांगांकडे पाहून व लहान शिखरे, मोठ्या शिखरांकडे पाहतांच किती लहान वाटतात याविषयीं ते लिहितात,

"जे मिजासखोर अधिकारी उच्चासनावर बसून लोकांचे मुजरे घेण्याचा दिमाख दाखवितात तेंच अधिकारी आला हजरतांच्या दरबाराच्या वेळेस आपल्या ढेऱ्यांच्या व्यासाला बगलसचा बांध घालून लुटुलुटु पळताना व हात जोडून अधोमुख उभे राहतांना पाहून सामान्य दृष्टीला जें एक प्रकारचें चमत्कारिक कुतूहल वाटतें तेंच कुतूहल याच पाइंट वरून या डोंगराची झालेली स्थिति पाहण्यांत वाटतें."

फिरस्त्यांची वृत्ति स्वभावत: अंतर्मुखी दिसते. वर्णनपर लेखांत जागजागीं तात्विक विचार विखुरले आहेत. त्यांच्या विनोदी लेखांत उत्कट तळमळी बरोबर जो उपरोध ठाईठाई भरला आहे तो उपरोध प्रवासवर्णनपर लेखांत नाहीं. तळमळीबरोबर सात्विक नि ऋजु विचार त्यांच्या उच्च सदभिरुचीची साक्ष देतात. महाबळेश्वराबद्दल ते लिहितात,

"शरीर उंच चढविण्यानें खालील देखाव्याचें जर इतकें सुख होतें, क्षणिक प्राप्त झालेल्या भौतिक विश्वव्यापक दृष्टीनें जर इतका आनंद होतो तर मनाला शाश्वतचे उंच चढविणारे महात्मे किती सुखी व आनंदी असले पाहिजेत बरे!"

"लागलीच असा विचार आला कीं, अरे, ह्या माझ्या मातृभूमीसाठीं मी काय केलें? जिच्या अंगावर मी लडिवाळपणानें बसलों त्या माझ्या मायदेशासाठीं मी काय केलें? मला येथें बसण्याचा अधिकारच काय? माझ्या कृति अशा कीं, ह्या सह्याद्रीनें अंगावर घेण्यापेक्षां आपल्या कड्याखालीं ढकलून द्यावें! आणि रागानें ती आतां ढकलणारच कीं काय? असाच क्षणभर मला भास झाला!"

उद्गारातील तळमळ अंतःकरणास भिडल्याशिवाय राहात नाहीं. फिरस्त्यांच्या धार्मिक व सामाजिक लेखांत शुद्ध तर्कपद्धति नि दीर्घ व्यासंग दिसून येतात तर त्यांच्या प्रवास वर्णनपर लेखांत सूक्ष्म निरीक्षण, अंतर्मुखी दृष्टि व भावनेची उत्कटता हे गुण नजरेंत भरतात. पण त्यांच्या विनोदी लेखांत सूक्ष्म निरीक्षणाला व भावनोत्कटतेला उपरोधाचें दासीपद मिळालें आहे.

कारण फिरस्त्यांच्या विनोदाचा आत्मा उपरोध आहे उपहास नाहीं. फिरस्त्याच्या विनोदी व उपरोधिक लेखांची संख्या पंधरा आहे यापैकीं दहा लेख उपरोधिक या सदराखालीं येतात व बाकीचे पांच विनोदी. पण हा भेदच मुळी चुकीचा आहे. कारण निवळ हंसविण्याकरितां लिहिला गेलेला असा एकहि लेख या संग्रहांत नाहीं. फिरस्त्यांचा विनोद हेतुनिष्ट आहे व प्रत्येक लेखांत प्रचलित पद्धतीवर त्यानीं कोरडे ओढले आहेत. त्याच्या या लेखांतील महत्वाचे म्हणून 'जदीद गणपती व कदीम गणपती' 'आमच्या गांवातील मोटार सर्व्हिस,' जलसे बिदाई, 'लेखक व कवि तयार करण्याचा प्रचंड कारखाना' नामनिर्देश करतां येण्यासारखे आहेत. 'जदीद व कदीम गणपती' वरील लेखासंबधानें आचार्य अत्रे आपल्या प्रस्तावनेत म्हणतात. 'गजाननाच्या पाठी मागें 'जदीद' व 'कदीम' ही म्लेंछ विशेषणें लागल्यामुळें त्याला या अन्यायाची दाद लावण्यासाठीं स्वर्गांत विष्णूपर्यंत ज्या चकरा घालाव्या लागतात, जागाजाग व्हिझिटिंग कार्ड, शिफारसपत्रे व मोदकाची लालूच 'समर्था घरीच्या श्वानांना' जी द्यावी लागते, त्याचें अत्यंत मार्मिक वर्णन 'फिरस्त्यानें' केलें आहे. सरकारी अधिकाऱ्यांच्या अनेक चक्रे असलेल्या यंत्रांतून एखादें क्षुल्लक कार्य साधतांना माणसाला जी प्रचंड यातायात करावी लागते त्यावर हें रूपक फार समर्पक आहे असें वाटतें.' पण या लेखांतील प्रादेशिकतेची जी मख्खी आहे ती परप्रांतीयांना कळणार नाहीं. फिरस्त्यांच्या लिखाणांत थिल्लर व नुसतें हंसविणारा विनोद नाहीं. तर चालतां चालतां गंभीर करणारा विनोद आहे. विनोद करतांना मुद्धां मार्गदर्शकाची भुमिका ते सोडीत नाहींत. गणपती वरील लेखांत विष्णु गणपतीस म्हणतो 'गजानना, तूं आपल्या भक्ताना

सद्बुद्धि दे. तुझे भक्त आज जातिभेदानें विभागलेले आहेत. त्यांना एक होण्याची बुद्धि दे. तुझे भक्त अस्पृश्य लोकांना तुझ्या दर्शनास व पुजेस येऊं देत नाहींत. असली संकुचित बुद्धि तूं त्यांतून काढून टाक, सर्व हिंदुमात्राला तुझ्या दर्शनांत व पूजेंत भाग घेण्याची बुद्धि तुझ्या भक्तांना तूं दे म्हणजे सर्व हिंदुमात्रांची प्रचंड एकी वाटेल ते कार्य करू शकेल.'

'आमच्या गांवांतील मोटार सर्व्हिस' हा लेख नितांत विनोदाचा उत्तम मासला आहे. भगवद्गीतेंतील श्लोक उद्धृत करून त्यातील वर्णिलेल्या अवस्था मोटार सर्व्हिसच्या पायीं कशा झाल्या याचें फार उत्तम वर्णन दिलें आहे. निरीक्षण तर इतकें सूक्ष्म व वर्णन इतकें हुबेहुब कीं अतिशयोक्ति काडीची देखील नाही इकडे सरकारी बसेस सूरू होण्याच्या अगोदरची स्थिति बरोबर वर्णन केली आहे. मोटारचें वर्णन पहा:--

'आमचे डोळे एकदम त्या हार्नच्या आवाजाकडे वळले. तो रंग उडालेल्या लाकडांच्या फळयांचा सापळा चाकावर उभा असलेला दूर एका झाडाखालीं दिसला.' कंडक्टर साहेबांचें वर्णन पहा:--

'पुढें कपाळावर केसांचा झुबका डोकावत आहे व मागे रूमी टोपीचा गोंडा लोळत आहे, अंगांतील शर्ट छातीवर फाटलेला आहे व त्यावर काळा कोट अडकविलेला आहे, अशी एक साधारण काळी कुळकुळीत व्यक्ति सिगा-रेटचा धूर सोडीत डुलत डुलत मोटारकडे येत असतांना दिसली.'

मोटारीचें हें वर्णन किती बहारीचें आहे! 'माणसानीं वेष्टिलेला हा लहानसा पर्वत रस्त्यानें धांवत चालला होता!' एखाद्या मेलेल्या मोठ्या किड्याला चोहोंबाजूनें अनेक मुंग्या तोंडांत धरून जशा ओढीत नेतात त्याच प्रमाणें आमच्या मोटारीला चोहोंबाजूनें माणसें धरून पळवून नेत आहेत असेंच कोणास वाटलें असतें.'

'दांताचे उपयोग' हा लेख कै. कोल्हटकरांच्या 'म्हातारपणाचे फायदे' या लेखाशीं तुलना करतां येण्यासारखा आहे या लेखांत कोटयांची व विनो-

दार्ची रेलचेल आहे. खालील उतारा कोणत्या तरुणाच्या मनाला गुदगुल्या करणार नाही ?

" शृंगार क्रीडेंतील 'चुंबन पुष्पें', ओठांच्या 'पाकळ्या' व दंतांच्या 'कुंदकळ्या' ह्यांनींच फुलून येतात ! कोणची यौवना आपल्या प्रियकराने केलेल्या दंतव्रणानें धन्य होणार नाहीं ? इतर क्षुद्र पेयांचें पान जिभेनें करतां येईल परंतु अधरामृतपान हें ओंठ व दांत ह्यांच्या हक्काचें आहे." तसेंच 'दांतांचा दरवाजा व त्यावर ओंठाचा पडदा करून जिभेस गोषांत ठेवलें आहे. ह्यावरून आमचे मित्र आली दांतखां म्हणतात, स्त्रियांना गोषांत ठेवावे हीच त्या अल्लाची इच्छा आहे.'

नितांत विनोदाचा हा लेख म्हणजे एक उत्तम नमूना आहे. 'लेखक' कवि' तयार करण्याचा प्रचंड कारखाना ! हा लेख वाचून गडकऱ्यांच्या कवीच्या कारखान्या'ची आठवण होते. साहित्यिकांच्या सद्य:स्थितींवरील हा लेख म्हणजे एक उत्कृष्ट रूपक आहे. त्याची खुमारी समग्र वाचल्याशिवाय कळायची नाहीं. 'हिंदु मुसलमानांच्या एकीची वाटाघाट', व 'आगंतुक ब्राह्मणांचा रुसवा' हें दोन्ही लेख दहा वर्षांपूर्वींच्या राजकीय मनोवृत्तीवर लिहिलेले उपरोधिक लेख आहेत. यांतील उपरोध सौम्य आहे. कै. शि. म. परांजप्यांचा दाहकपणा व विषारीपणा यांत नाहीं. 'येथून तेथून चुकलेलीं खानेसुमारी' या लेखांत सामाजिक दोष फार कुशलतेनें दाखविले आहेत.

'पुरुषार्थ धर्म अंगी किंचित ही नसणाऱ्या कित्येक लोकांना पुरुषांत घातलें होतें' तसेच म्हैस, बैल, घोडा इत्यादि जनावरेंच नव्हेत तर, 'बेडूक, झुरळ, बागुरडें इ. लहान प्राण्यांनाही स्वाहा करणाऱ्या कित्येक जपानी व चिनी लोकांना अहिंसा प्रतिपादन करणारा 'बौद्ध' धर्म चिकटविला होता. त्याचप्रमाणें व्याज चक्रवाढ व्याज, नाबेगहाण, खोटया साक्षी व खोटे दस्ताऐवज इत्यादि इत्यादि हत्यारांनी गरीब शेतकऱ्यांचा फन्ना उडविण्यांत तरबेज झालेल्या कित्येक सावकारांच्या गळयांत, प्राणिमात्रांस

न दुखविणारा जैन धर्म लटकावन दिला होता.' लेखांतील हे उतारे उपरोधाची उत्कृष्ट उदाहरणें आहेत. 'व्यासानें न लिहिलेली विश्वामित्रांची दुसरी एक कथा' ही सुद्धां प्रचलित राजकारणावर लिहिलेली कथा आहे. विश्वामित्राला वाटलें कीं आपल्या शिष्यांना सज्ञान केलें की ते स्वतंत्र होतील व मग आपली सेवा कोण करील म्हणून त्यानें त्यांना अज्ञानांत ठेवण्याचा निश्चय केला व या करितां फूट पाडली कांही जणांचा त्यानें अतिशय छळ केला. तर कांहीं जण त्यांच्या कृपेच्या आशेनें त्याची सेवा करू लागले. बंडखोर शिष्यांचा पुढारी गाधिज हा होता. वाचकांनी ही नांवें लक्षपूर्वक पाहावींत, म्हणजे नावें आजकालच्या कोण्या प्रसिद्ध व्यक्तींशीं जुळतात हें त्यांना कळेल. गाधिज, देवदत्त, युधिष्ठिर, सेनगुप्त, मैत्रेय, विष्णुशर्मा, कौंडिण्य, भार्गव, रत्नपाल इत्यादि शिष्यांचा विश्वामित्रानें छळ केला. पण या लोकांनी अनत्याचाराचें व्रत सोडले नाहीं बरें ज्या शिष्यांनीं भेकडपणानें विश्वामित्राला सांगितले की, आम्हाला शिक्षा नको, तुझ्या विषयीं आमच्या मनांत प्रेम आहे, त्यांची नावें वाचकांनी लक्षांत ठेवावींत, जयंत शर्मा, सर्पशर्मा व चिंतामणि शर्मा ही तीं नावें आहेत. सध्यांच्या कोणत्या व्यक्तीशीं ही नांवें जुळतात हे मार्मिक वाचकास सांगणें नलगे. शेवटी विश्वामित्राचा पराजय झाला असें दाखविलें आहे. 'अर्थशास्त्रांतील एक क्रान्ति' 'लगाम,' 'दिरंगाई उर्फ हळूबाई इचा अर्ज' यापैकीं शेवटचा लेख प्रादेशिक आहे. त्यांतील खालील श्लोक तर इकडील लोकांना खात्रीनें मजेदार वाटेल.

'अभी' नि शब्देन पक्षांतराणाम्'
'आज कल' शब्देन मासांतराणाम्'
'करूंगा देखुंगा' वर्षांतराणाम्'
'देऊंगा दिलाउंगा' युगांतराणाम्'

पण सर्वांत बहारीचा लेख म्हणजे जलसे बिदाई वरचा आहे. याबद्दल आचार्य अत्रे म्हणतात--

" ' जलसे बिदाई ' हा ' फिरस्त्या ' च्या विनोदी लेखांचा मेरुमणि आहे. हैद्राबाद संस्थानांत अधिकाऱ्यांच्या बदल्या झाल्या म्हणजे त्यांना निरोप देण्याचे जे समारंभ साजरे होतात त्याला जलसे बिदाई असें म्हणतात. अधिकाऱ्यांच्या भयानें वरकरणी सन्मानाचा जो देखावा गरीब रयतेला किंवा दुय्यम नोकरांना मनाविरुद्ध करावा लागतो त्याचा पोकळपणा फारच बहारीनें व्यक्त केलेला आहे. प्रसंगनिष्ठ विनोदाचीं उदाहरणें यामध्यें विशेष आहेत.. .. सदर निबंध फिरस्त्यांच्या प्रांतिक विनोदाचें एक घवघवीत उदाहरण आहे. " या लेखांतील उतारे दिल्यानें त्याची मजा कळणार नाहीं. वाचकांनीं समग्र लेखच वाचून पहावा. पण एक उतारा या लेखाची खुमारी दाखविण्यास पुरेसा आहे

" एका बिदाई जलशांत तर जे सामान आणले गेलें, त्यापैकीं फक्त एक दशांशच टेबलावर ठेवलें व नऊ दशांश बाजूला बगळून ठेविलेलें दिसलें. तें माझ्या दृष्टीस पडतांच व्यवस्थापक पेशकार साहेब होते त्यांना मी विचारलें अहो ! हें सामान बाजूला कां ठेविलें ? ......शेवटीं त्यांनीं एका चपराशास बोलावून ' यहां से सब सामान उठाके मेरे घरकू पोहोंचा देव चलो ! घरकू लेजाव, अॅट होम जलदी ' असा निर्वाणीचा हुकूम दिला त्या बरोबर अॅट होमचा अर्थ माझ्या चटकन लक्षांत आला !

फिरस्त्यांच्या एकंदर लिखाणाचें काय स्वरूप आहे ? मेवा आस्वादून खालीं ठेविल्यावर जे विचार मनांत येतात ते हेच कीं, फिरस्ते हे वृत्तीनें गंभीर व विचारशील आहेत. कोणत्याहि गोष्टीचा सांगोपांग विचार केल्याशिवाय ते कोणतेच विधान करीत नाहींत. त्यांचा अभ्यास दीर्घ व व्यासंग दांडगा आहे. विचारसरणी तर्कनिष्ट आहे. त्यामुळें त्यांचें गंभीर लिखाण वाचतांना प्रत्येक वाक्य म्हणजे उद्दिष्टाकडे नेणारी एक एक पायरी आहे असें वाटतें व पुढें पाऊल टाकलें कीं, एक एक दार उघडून मन रमवीत रमवीत ते हाताला धरून गहन विचाराकडे घेऊन जाताहेत असें वाटतें. त्यांचें प्रवास वर्णनपर लेख त्यांच्या सूक्ष्मनिरीक्षणाची साक्ष देतात; तसेंच

त्यांच्या अंतर्मुखी वृत्तीचाही निर्वाळा देतात. लिहितां लिहितांच गंभीर होण्याची त्यांची संवय आहे. त्यामुळे त्यांच्या विनोदी लेखावर ही गांभिर्याचें आवरण पसरलें आहे व निवळ हंसविणें त्यांच्या विनोदाचा हेतु नसावा हें चटकन ध्यानांत येतें. त्याचा विनोद हा येथून तेथपर्यंत उपरोधावर आधारला आहे अच्युतराव कोल्हटकरांच्या विनोदाचा उपहास हा आत्मा होता पण फिरस्त्यांनीं उपहास उपयोजिला नाहीं. उपहासांत प्रतिपक्षाची हेटाळणी हेंच मुख्य असतें. आहे ती परिस्थिति सुधारावी याची तळमळ नसते. पण फिरस्त्यांच्या उपरोधाला तळमळीची जोड आहे ही त्यांची तळमळ जागोजागी व्यक्त होते. आचार्य अत्रे म्हणतात

'केवळ विनोद निर्माण करण्यासाठी किंवा वाचकांना हसविण्यासाठी 'फिरस्त्यानें' आपला विनोद निर्माण केला नाही. त्याचा विनोद हेतुप्रधान व तत्वदर्शी आहे. तथापि कला व तत्व यांचे मिश्रण बनवितांना कलेचें मनोरंजकत्व व आकर्षणीयत्व नाश न पावेल इतक्यान घेतांनी त्यानें तत्वाचे थेंब आंत टाकले आहेत. हेंच त्यांच्या विनोदाचे वैशिष्ठ्य आहे याच्या विनोदानें वाचक हंसता हसताच एकदम गंभीर बनेल व ही गोष्ट हसण्यावारी घालविण्यासारखी नाही, याच्या आत काही तरी मख्खी आहे याची जाणीव त्याच्या मनांत जागी होईल." . पुन्हां एके ठिकाणी ते लिहितात, "कित्येक वेळी आपल्याला गुदगुल्या होत आहेत कीं चिमटे बसत आहे हेंच मुळीं कळत नाहीं."

फिरस्त्यांचा विनोद हेतुप्रधान आहे. प्रसंगनिष्ट विनोद त्यांना जितका उत्तम साधतो तितका व्यक्तिनिष्ट साधत नाही व रूपकात्मक लिखाण लिहिण्यांत त्यांना जें यश मिळालें तें व्यक्तिनिष्ट विनोदांत मिळालें नाहीं. तसेंच छोटया उपमा त्याना क्वचितच सुचतात म्हणजे एकाद्या वस्तूला थोडक्यांत दुसऱ्या एका वस्तूची उपमा ते सुचवूं शकत नाहीत. त्यांना एक एक परिच्छेद खर्ची घालावा लागतो. मॅथ्यु अर्नाल्डचें असेंच होतें. असो.

मराठवाड्यांतील वाङमयांत फिरस्त्यांचे काय स्थान आहे? उत्कृष्ट

तर्कपद्धति, उच्च सदभिरुचि, सात्विक भाषामरणी, गोड व प्रभावी शैली, गंभीर विनोद, समाज कार्याविषयीं व्यक्त होणारी तळमळ व धार्मिक रूपकें यामुळे ते महाराष्ट्रांतील लेखकांत फार वरच्या दर्जांत मोडतात. त्यांचा विनोद कोल्हटकरांच्या अतिशयोक्तीपासून व गडकऱ्यांच्या कोटयापासून अलिप्त आहे आपल्या लिखाणामुळे सरस्वतीच्या दरबारांत त्यांनीं मानाची जागा पटकाविली आहे. मराठवाड्यांतील वाङ्मयसेवकांना तर ते वयानें, व्यासंगानें व अनुभवानें गुरुस्थानी शोभतात आम्हां तरुणांना त्यांचा आशीर्वाद असावा हीच आमची त्यांना विनंति आहे.

# श्री. यशवंत सदाशिव कोरेकल.

काव्यकौस्तुभ वृत्तसम्राट यशवंत सदाशिव कोरेकल हे कवीच आहेत असें नव्हे ते एक कसलेले गद्य लेखक पण आहेत. गेल्या दोन वर्षांत "विचार वैभव", "कौस्तुभ किरण" व "यशोविलास" हीं तीन पुस्तकें लिहून या प्रेमळ व गोड तत्वज्ञान्यानें मराठवाड्यांतील वाङ्मयांत निःसंशय सुंदर भर घातली आहे. वेदांत विषयावरील त्यांचे लेख "विचार वैभव" पुस्तकांत समाविष्ट केलेले आहेत. हें पुस्तक आक्टोबर १९३८ मध्यें प्रसिद्ध झालें. दुसरें पुस्तक 'कौस्तुभ किरण' लघुकथा व निबंध सग्रह हें गतवर्षी म्हणजे १९३९ मध्ये प्रसिद्ध झालें. तिसरें पुस्तक 'यशोविलास' हें पण त्याच सुमारास प्रसिद्ध झालें. कोरेकलांचें परीक्षणात्मक लेख, वाङ्मय विषयक विचार व व्याख्यानें या पुस्तकांत समाविष्ट झालीं आहेत. किर्लोस्करांच्या संगीत सौभद्राचें समालोचन, वाङ्मय तप, साहित्य वाङ्मय, त्रिविध विचार इत्यादि उत्कृष्ट लेख या पुस्तकांत आले आहेत.

कोरेकलांचीं हीं तीन पुस्तकें म्हणजे त्यांच्या एकंदर विचारांची व तात्विक प्रश्नाबद्दल सूक्ष्म निरीक्षणानें त्यांनी ठरविलेल्या सिद्धांतांची

भांडारेंच होत कोरेकरांनीं द्वैत, अद्वैत, वेदांत, मानवाचें इतिकर्तव्य, वाङ्मय, साहित्य, आधुनिक संस्कृतींतील गुणदोष इत्यादींवर गहन व खोल विचार करून ते या वरील तीन पुस्तकांतून मांडले आहेत. या सर्वांगीण प्रश्नावर मराठवाड्यांत तर कोणी इतका खोल विचार केला नाहीच पण महाराष्ट्रांत सुद्धां इह व पर अशा दोन्ही लोकांच्याबद्दल विचार केलेले साहित्यिक हाताच्या बोटांवर मोजण्या इतकेच सांपडतील

प्रथम आपण कोरेकरांच्या " विचार वैभव " पुस्तकासबंधीं विचार करू यांतील विषय-सूचीवरूनच पुस्तकासंबंधी कल्पना येईल. एकवाक्यता, स्वप्न व जागृति एकच, सुषुप्तीचे महत्व, समाधि अवस्था, सहजमुक्ति, अनाद्यनन्त सुखप्रवाह, चिद्विलास भावना, चिद्विलास, विलक्षण आत्मा, आत्म-स्वरूप, देह-शकट, आमची झोंप, शिक्षण, वाङमय व ध्येयानुसंधान ही प्रकरणे यांत आलीं आहेत त्यांत अद्वैत वेदांतासबधीं पूर्णपणें विचार केला आहे या संबंधीं आपल्या अभिप्रायात श्रीधरशास्त्री पाठक म्हणतात "श्री. यशवंतरावजी यांचें उपनिषद वाङमयाचें परिशीलन चांगलेंच झालेले आहे व अद्वैत सिद्धांत त्यांस मान्य असल्यानें त्यानी भगवद् पूज्यपाद श्री शंकराचार्यांच्या प्रस्थानत्रयाचेंहि उत्तम परिशीलन केलेलें आहे त्यामुळे त्यांचें प्रतिपादनांत एकही अपसिद्धांत झालेला नाहीं... ..आमच्या दृष्टीनें स्वतंत्र प्रकरणांनीं लिहिलेला व अद्वैताचे सर्व सिद्धांत समजावून सांगणारा हा अपूर्व ग्रंथ आहे." पाठकांच्या वरील अभिप्रायाशी कोणाचेंहि झालें तरी एकमतच होईल. कोरेकरांनीं वेदांतातील एक एक विषय घेऊन त्यावर सुसंगतवार चर्चा केलेली आहे. स्वप्न व जागृति एकच कशी, वेदांतांत तम प्रकाश, ज्ञान अज्ञान, हर्ष शोक इत्यादींची एकवाक्यता कशी आहे, इत्यादि विषयासंबंधीं त्यांची चर्चा पाहिली तर कोरेकरांचा व्यासंग किती दांडगा आहे व वेदांताचें अध्ययन त्यांनीं किती सूक्ष्मपणें केलें आहे हें प्रत्ययास येतें. वेदांतांत ज्ञान अज्ञान, प्रकाश अंधकार व हर्ष शोक इत्यादि विरोधांची एकवाक्यता आहे. हा सिद्धांत चर्चितांना कोरेकरांनीं हर्ष शोक व सुख दुःखाची व्याख्या केली आहे 'अमर्याद आनंदानंतर मर्यादित पण श्रमाधिक्यानें प्राप्त

झालेल्या वस्तूबद्दल हर्ष म्हणतां येईल, तसेच तत्संरक्षणार्थ अतिशय कष्टात्मक यत्न करूनहि ती गमावली तरच त्या स्थितीला 'शोक' म्हणतां येईल असें कोरेकल म्हणतात. "हर्ष शोक" हे सुख दुःखाहून जरा अधिक प्रमाणाचे असून ते जरा अधिक काल टिकतात ही "अनुकूल वेदनीयम् सुखम् प्रतिकूल वेदनीयम् दुःखं" ही सुख दुःखाची व्याख्या आहे. पण सुख म्हणजे वेदनाच. सुख म्हणजे आनंद नाहीं व हें सुख शाश्वत नाहीं अशी कोरेकलांची विचारसरणी आहे. या बाबतीत फिरस्त्यांचा लेख 'सुखासबंधीं कांही विचार कोरेकलांच्या "सुख प्रवाह" या लेखाशीं तुलना करून पाहाण्या-सारखा आहे. या दोन लेखावरून आपल्या येथील या दोन तत्वे त्यांची विचार सरणी, सुसंगतवार चर्चा, भाषा व शैली व सिद्धांत यांतील भेद दिसून येतील. फिरस्ते सुखाबद्दल म्हणतात, 'मनाच्या इच्छा तृप्त झाल्या म्हणजे मनास जी अनुकूल संवेदना प्राप्त होतें त्यासच सुख म्हणतां येईल. प्राण्याची वाढ इच्छा तृप्तीनें म्हणजे सुखामुळें होतें दुःखनाश म्हणजेच सुख असे नसून सुखाच्या वेदना स्वतंत्र आहेत. सुखाचे ही तीन प्रकार आहेत इंद्रिय सुख, त्याहून उच्च बुद्धीचें सुख आहे म्हणजे बुद्धिद्वारा मनास जे सुख होतें तें भूतदया, परोपकार, आदरातिथ्य, प्रेम, कर्तव्य वगैरेनीं जें सुख मिळतें तें बुद्धीचें सुख होय, याच्या ही पेक्षां उच्च सुख म्हणजे आत्मसुख होय. सर्व-स्वाच्या त्यागांतच हें सुख लाभतें. 'आत्म्याचें स्वरूप आनंदमय म्हणजे सुखमयच आहे व हें सुख आत्म्यांतच आहे. बाहेरच्या वस्तूंत सुख नाहीं. ही मीमांसा फिरस्त्यांनीं केली आहे. आनंद हें आपलें पूर्ण नित्योपलब्ध, स्वयंस्वरूप होय. सुख हें तदंश होय ( पान ९७ ) सुखांत ऐहिक व पारमार्थिक ( अभ्युदय व निःश्रेयस ) असे दोन भाग तात्त्विक दृष्टया पडत नसून सांसारिक विचारान्वेय सर्वसाधारण समजुतीनें पडतात. परंतु सुख केव्हांहि व्यावहारिक आणि अशात्मकच असतें. तात्विक म्हणूं गेल्यास आनंद होय. सुख हें सापेक्ष इंद्रियगम्य विषयात्मक म्हणून मर्यादित अर्थात अशात्मक आणि आनंद हा निरपेक्ष इंद्रियावगम्य, निर्विषयात्मक व स्वसंवेद्य आहे. सुखाला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. एकाच वेदनेचे सुख दुःख हे दोन भाव आहेत. पूर्वीचें

अनुकूल वाटणारे पुनश्च अनुभवावयाचें म्हणजेच सुख होय. सुख व दुःखामध्यें सुखाभास म्हणून आहेत. दुःख हा पदार्थ स्वतंत्र नसून सुख व बुद्धिकृत संकल्पाचा विकार आहे.

मागाश निरपेक्ष सुख म्हणजेच आनंद होय असें कोरेकलाचें म्हणणें आहे. फिरस्ते सुखाला स्वतंत्र अस्तित्व देतात कोरेकल देत नाहीत. फिरस्ते निरपेक्ष सुखाला सुद्धां आत्म्याचें सुख असें नाव देतात. कोरेकल त्याला आनंद म्हणतात. सुख आत्म्यातच आहे असें फिरस्ते म्हणतात (पान २५) तर 'सुख हें स्वतःचे स्वरूप आहे' असें कोरेकल म्हणतात आणि सर्वांत मोठा जो फरक या दोन विचारवंतामध्ये आहे तो हा की फिरस्ते हे समष्टीच्या हिताच्या दृष्टीनें सुखाची मीमांसा करतात तर कोरेकल हे व्यक्तीच्या दृष्टीनें पाहतात. पण हा फरक फक्त दृष्टिकोणाचा झाला. विचारांच्या सुसंगतपणात व प्रमेय मांडताना त्यांच्या पार्श्वभूमीची अगोदर मांडणी करण्यांत व शक्य तितक्या सुलभ भाषेत विचार मांडून ते सर्व साधारणास समजाविण्याचा दोघांचाहि हातखंडा आहे. पण त्यांतल्यात्यात कोरेकलांच्या भाषेत क्लिष्टपणाचो झाक मारते. अर्थात्, विषय अवघड आहे यात संशय नाही तरी पण खालील वाक्य वाचून वाचक किति गुदमरून जातो पहा

"एवंच पचकांश सदृश पंचीकरण दृष्ट्या कार्यकारण भिन्नत्वे स्थूल सूक्ष्मरूपानें उत्पत्तिलयाच्या क्रियेवरून (किंवा स्वरूपभूत निष्क्रियते-वरून त्याचे मूर्तामूर्तरूप ध्यानांत येऊन विचार केल्यासही समजून येतें कीं, क्रियासचाररहित (किंवा सहित म्हटल्यासही अधिष्ठान स्वरूपाने) एकत्व असें शक्तिमान, व्यापक आणि सर्वत्मानुस्यूत आहे जे अनेकाकारांत परिणत होऊन किंबहुना उपाधि कृत कार्यांनी कार्य कर्तृत्व जसें दिसून येतें तद्वत् विविध रूपांतरें दृश्यमान करून ही तें पूर्ण अलिप्त आहे."

पण हें जरी असले तरी एकदरींत विषयाच्या मानानें कोरेकलांनीं आपले विचार शक्य तितक्या सुबोध भाषेत मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

या दृष्टीनें कांडत्रयावरील त्यांचे लेख व देहशकट, झोंप इत्यादींवरील लेख वाचनीय आहेत कांही कांहीं ठिकाणी तर भावनेच्या उत्कटते बरोबर त्याची भाषाही कशी ओघवती व रसपूर्ण झाली आहे. पहा:–

"तोच श्रीरामचंद्र हिंदुस्थानांत आहे पण रत्नखचित सुवर्ण खिडकींतील तेजस्वी मौक्तिक झालरीचा पडदा वामहस्तानें सारलेला राम झरूके बैठके सबका मुजरा लेत आणि जाकी जैसी चाकरी वाको वैसा देत देणारा राजाधिराज श्रीरामचंद्र नसून फाटके कपडे सुद्धां अगभर नसल्यानें एकच वल्कल गुंडाळून 'सीता! हा सीता! असें तोंडास कोरड पडेपर्यंत उच्चरवानें ओरडत वनांत वणवण फिरणारा वनवासी, तापसी भस्मोद्धूलित वैरागी राम गुसाई मात्र आहे. तोच योगेश्वर श्रीकृष्ण हिंदुस्थानांत आहे पण तो दिव्य मुकुट मकर कुंडल पीतांबरधारी सवा लक्ष सोनेरी पताका फडकावणाऱ्या द्वारकेचा राजा कृष्ण भगवान नसून वृक्षाखालीं एखाद्या भणंग भिकारी, परदेशी प्रवाशाप्रमाणें उघड्या जमीनीवर पद्मचिन्हान्वित पायांतून व्याधाचा बाण गेल्यामुळें धुळींत पडलेला असा अत्यंत साधा गोपाल कृष्ण आहे. तसाच अर्जुनही येथें आहे; पण तो सात अक्षौहिणी सैन्याचा चालक, अधिपति अत्यंत तेजःपुंज नरवीर पार्थ नसून कृष्णावतार समाप्तीनंतर अत्यंत क्षुद्र अशा "भिल्ल पारध्यापासून अल्प उरलेल्या कृष्ण परिवार संरक्षणार्थ आपलेंच नेहमीचें गांडीव धनुष्य महत्प्रयासानें ही न उचललें गेल्यामुळे त्याबद्दल धडपड चालविलेला हतबल निरुत्साही फाल्गुन मात्र आहे. तस्मात् कालाय तस्मै नमः" (पान २२५) कोरेकलाची अशी प्रभावी भाषा इतकी क्लिष्ट का ठेवावी याचा विस्मय वाटतो. हेंच प्रत्यंतर त्यांचीं इतर दोन पुस्तकें कौस्तुभ किरण व यशोविलासमध्यें दिसून येतें. अद्वैत वेदांतांत ते लीलया खेळणारे पट्टीचे खेळाडू आहेत व एखादा कसलेला खेळाडू इतर लोकांना अवघड वाटणारे खेळ जसे लीलेनें करून दाखवितो तसेंच त्या अवघड विषयांना ते लीलेनें हाताळूं शकले तरी त्यावरून ते नुसते वेदाभ्यासजडविद्वान आहेत असें कोणी समजूं नये. निजाम महाराष्ट्रांतील या तत्वज्ञानें जगांतील प्रत्येक महत्वाच्या विषयाबाबत आपला

दृष्टिकोण विशद करून आपलें स्वत्व पटवून दिलें आहे. यशोविलास मधील त्यांचे वाङ्मयावरील विचार मननीय आहेत, साहित्याची व्याख्या करतांना कोरेकल म्हणतात 'सत्य, हृदयाला पटणारें मार्मिक, बुद्धीला चैतन्य देऊन त्याचा विकास करणारे कालाच्या मावळत्या ओघाबरोबर वाहून न जाणारे अनेकांच्या विचारानें संस्कारित झालेलें गद्य पद्यमय प्रबंध म्हणजे साहित्य होय.' या व्याख्येला कोणी विरोध करील असें वाटत नाहीं तसेंच पुरोगामी वाङ्मयाची व्याख्या करितांना पुण्यास पांगारकरांनीं सत वाङ्मयास पुरोगामी म्हटलें, व पेडशांनीं समाजाचा तोल सावरणारे वाङ्मय तें पुरोगामी वाङ्मय अशी व्याख्या केली व जोशी वगैरे मंडळीनीं समाजाला पुढे नेणारे तें वाङ्मय पुरोगामी असें म्हटलें. त्या व्याख्यांशी व कोरेकलांच्या साहित्य शब्दाच्या व्याख्येशीं तुलना करून पाहण्यासारखी आहे. वाङ्मयाविषयीं श्री. कोरेकल म्हणतात की, "जगांत वाङ्मयासारखी ऐक्यता सांधणारी गुरुकिल्ली दुसरी नाहीं. शक्ति, बल, विविधता वृत्तिधर्म आणि प्रकृति या सर्वांचा संगति सुगम करण्यास वाङ्मयाची फार जरूरी आहे. किंबहुना याशिवाय ती साध्यही नाही. पण याचा अर्थ जगांत एकच भाषा नांदावी असा नव्हे. तसेंच स्वभाषेचा अभिमान म्हणजे दुसऱ्या भाषेची निंदा नव्हे. इतकेंच नव्हे तर दुसऱ्या भाषेतील कोणताहि सुंदर भाग आपल्या भाषेत घेऊन त्याला स्वदेशीय स्वरूप देणें हें स्वाभिमानाचें द्योतक होय. अर्थात् भाषावृद्धीचा खरा उपाय म्हणजे स्वतंत्र ग्रंथ सामग्री तयार करणें हा होय. परभाषेतील सुंदर भागाला स्वदेशीय रूप देऊन आत्मसात करून घेण्यास कोरेकल तयार असले तरी परभाषेतील शब्द घेण्याची प्रवृत्ति ही याचकतेच्या दृष्टीनें आक्षेपार्ह आहे. जिंकलेला प्रदेश आपल्या देशाला जोडण्यांत जेत्याला जसा आनंद वाटतो तसा काहींसा भाग यांतही आहे. पण त्यांत भेसळ किंवा अपभ्रंश होतां कामा नये .... ज्या स्थितीत जो परका शब्द आपण आत्मसात् केला किंवा करतो त्याच स्थितीत तो राहूं दिला पाहिजे असें करण्यांत एक प्रकारचें स्वारस्य आहे. पण त्या शब्दाशी स्नेह करून किंवा स्नेहाच्या अतिरेका बरोबर त्याला व स्वत:लाही बाटवून घेणें केव्हांही योग्य नव्हे." श्री.

कोरेकल हे स्वभाषाभिमानी आहेत. "स्वभाषेची संपन्नता दुसऱ्या भाषेतील शब्द घेऊन होणार नाहीं" हें त्याचें स्पष्ट मत आहे. पण त्यांचा कटाक्ष परकी शब्दांना उलट सुलट न करतां तसेच घ्यावे यावर आहे. उदाहरणार्थ गहजब, महशूर याचे मूळ उर्दू गजब, व मशहूर असे आहेत. ते जसेच्या तसेच घ्यावेत. माझ्यामते कोरेकलांचे मत सर्वमान्य होणार नाही. आधींच पटवर्धन, सावरकर इत्यादींच्या भाषाशुद्धीच्या चळवळीत परकी शब्दाला थारा नाहीं. त्यांतल्या त्यांत अपरिहार्य म्हणूनच परकी शब्द घ्यायचे तर तें मूळच्याच शब्दांत घ्यायचे हा कुठला आग्रह? त्यांचे मूळचे शुद्ध स्वरूप काय होतें हें समजण्याकरिता असे करायचें तर मग आत्मसात् करून घेण्याचा प्रश्न कोठें राहतो. माझ्या मतें कोरेकलाची भूमिका या बाबतींत थोडीशी सदोष आहे. या प्रांतांतील भाषेच्या अध्ययनानें त्यांना परभाषेतील शब्द मूळच्या स्वरूपात घेण्याची कल्पना आली असावी.

मुक्तछंदाविषयीं कोरेकलांचा विरोधी कटाक्ष तर प्रसिद्धच आहे व वृत्तांवरील आपलें प्रेम व स्वामित्व दर्शविण्यासाठींच त्यांनीं आपला कविता संग्रह (पाकळी दुसरी) प्रसिद्ध केला आहे. या बाबतीत त्यांची भूमिका अधिक स्पष्ट नि आग्रही आहे. ते म्हणतात.

"वृत्त, छंद, प्रासानुप्रास, यमक, यति इत्यादि काव्यालंकार कवितेच्या मालकीचे आहेत ते दागीने स्फूर्तिरूपानें उज्ज्वल झाल्यावर ते सर्व किंवा त्यापैकीं कांहीं अंगावर घालणें किंवा न घालणें हा सर्वस्वी कविता देवीच्या मर्जीचा प्रश्न आहे! कवीनें ते जबरीनें काढावयास लावणें हें केव्हांही योग्य होणार नाहीं. कांही दागिनें मांगल्यसुचक आणि अत्यावश्यक असे असतात त्यांतल्या त्यांत खास मंगल नामक एक अत्यंत महत्वाचा दागिना असतो .... तो प्रमुख अलंकार म्हणजे वृत्तसूत्रांत ओंवलेला प्रास होय.... .. कवि व्यावहारिक व्यासंगाला विसरून निसर्गाशीं तादात्म्य पावल्यावर काव्य स्फूर्तीसरशीं जी उत्प्रेक्षा करील ती खरी स्फोरकता असें मला वाटतें."

वरील उताऱ्यावरून कोरेकल नीति व सदाचार संवर्धनालाच साहित्याचें प्रमुख लक्षण कसें ठरवितात व काव्यांत सुद्धां ते शिस्तीचे किती भोक्ते आहेत हें दिसून येतें. संगीताबद्दल सुद्धां त्यांची अशींच स्पष्ट व निश्चित मतें आहेत. आण्णासाहेब किर्लोस्करांच्या "संगीत सौभद्र" या नाटकाची चर्चा करतांना कोरेकलांना आण्णासाहेबांची स्तुति करण्याजोगा मुख्य गुण जो सांपडला तो म्हणजे किर्लोस्करांच्या 'संगीतकृतीसंबंधी सर्व साधारण दृष्ट्या समयोचित रागाची शास्त्रसंमत संयोजना हा होय.' अमुक वेळेला अमुक रागांत गाणें म्हटलें पाहिजे असा जो संगीतांत नियम आहे त्याचें परिपालन किर्लोस्करांनीं केलें आहे असें कोरेकलांचें म्हणणें आहे; अलीकडे श्री. फडक्यांच्या भाषणापासून संगीताचे राग वेळ काळ पाहून म्हणण्यांत कांहीं विशेष स्वारस्य आहे काय हा प्रश्न प्रामुख्यानें चर्चिला जाऊं लागला आहे. या बद्दल कोरेकलांसारख्या अधिकारी पुरुषांनी आपले विचार मांडले तर या चर्चेला व्यापक स्वरूप येईल. पण कोरेकल या प्रश्नाबद्दल ही शिस्तीचे भोक्ते आहेत. कोणताहि राग असो तो ठरीव वेळीच म्हटला पाहिजे असें त्यांना वाटतें. बेबंदशाहीची त्यांना मनापासून चीड आहे. पण सौभद्राच्या समालोचनांत मात्र त्यांनीं किर्लोस्करांत नसलेला गुण त्यांच्यावर चिकटविला आहे. सौभद्रांतील पदे समयोचित रागात म्हटलीं गेलीं आहेत काय? नाहीं. पण त्यांचीं सांवरासांवर करताना कोरेकलांची किती तारांबळ उडाली ती पहा. ते स्वतःच म्हणतात (पान २३ यशोविलास) "पण नीलांबरीपर्यंतच्या रागांना जी क्रमसिद्धि साधली तिला मध्येंच अवेळी आलेल्या "वेलावली"चा अडथळा आला कारण, त्याबद्दल "प्रातःकाले" हें शास्त्र वचन समयानुचित प्रतिकूल असें आहे, तरी इतके तंतोतंत शास्त्र परिपालन सर्वशः प्रचारांतही पण नाहीं." तिसऱ्या अकांत ही असाच घोटाळा उडाला आहे. त्याची चर्चा करतांना कोरेकलाचा युक्तिवाद पहा. ते म्हणतात (पान ३०) "इतक्या बारकाईनें पाहिल्यास प्रत्येक अकांत असे अनेक आक्षेपार्ह प्रसंग दिसून आल्यानें इकडे आमचा मुख्य हेतु जो किर्लोस्करांच्या शास्त्र वचन परिपालनांतील दक्षता निर्देशनाचा आहे त्या

वरच "मूले कुठार:" या न्यायें कृतप्रणाश नामक मोठा दोष येतो तर तिकडे "मन:पूतम् समाचरेत" ही औपहासिक म्हण लागू केल्याचा अकृताभ्यागम दोषहि येऊन चिकटतो!" यांतून कोरेकल पळवाट कशी काढतात पहा मन:पूत याशब्दाचा श्लेष काढून ते म्हणतात कीं मन:पूत याचा अर्थ मनसोयक्त असा न घेता शास्त्रीय अडचणीतून पार पडण्यास वावच सांपडत नसला तर अशा प्रसंगीं आपल्या मनालाच विचारावें व तें जो मार्ग दाखवील तो पूत पवित्र सन्मार्ग समजून त्याचें अवलंबन करावें, असा खरा अर्थ होय. संगीत सौभद्र ही किर्लोस्करांची अमरकृति होय पण समयोचित रागांतील आणि हाच कांही त्या नाटकाचा मुख्य किंवा प्रशसनीय भाग नव्हे पण हें प्रमेय एकदां कोरेकालांनी गृहीत धरल्यावर त्यांना चर्चा करितांना कोरेकलांची तारांबळ उडाली व त्यांना कांही तरी व कमानरी मार्ग काढावा लागला.

कोरेकलांनी निवळ अद्वैत वेदान्तावर व साहित्य नि वाङ्मयावरच विचार केला असे नसून त्यांनी आधुनिक संस्कृतिविषयीं व आपल्या समाजांतील गुणदोषांविषयी आपली मतें निर्भीडपणें मांडलीं आहेत व आपली ही मतें यांनी मोटार मन्वतर, धर्मरूढि बधन इत्यादि इत्यादि प्रहसनांतून मांडलीं आहेत आधुनिक मत्र प्रधान संस्कृतिविषयीं ते म्हणतात "खरच विचारांनीं आढळून येतें की, यांत्रिक सामर्थ्यावर आजकाल आमचें जीवित्व अवलबून आहे. घरांतील प्रत्येक वस्तूचे जनकत्व मत्राकडेच आहे..... या योगानें तर खिळ्यापासून तो मोटारीपर्यंत यांत्रिक वस्तु म्हटली कीं गळयाचा ताईत होऊन बसते. वस्तूंतील सौकर्याच्या दृष्टीनें वर वर वाटतो फायदा, पण ती मुळें गरजेची तृष्णा जी पळापळानें वाढत पुढें पुढे तर ती पावलोपावलीं नडावयला लावतें यावरून सूक्ष्म विचार तर...... त्यातही तात्विक दृष्टया पाहूं गेल्यास निसर्गानें कार्याची जी एक गति ठरवून ठेविली आहे. तदनुसार वर्तनच मानवी जीविताला श्रेयस्कर होतें. मोटार विमानासारख्या तीव्र गतिक यत्रसाहृयानें वेळेचा बचाव करूं लागलों तर तीव्र गतीनें ध्येयस्थानाचें अतर जसें जसें लवकर छाटलें

गेलेलें दिसून येतें, त्या मानानें ठराविक हिशेबाच्या परिपूर्ततेंतही मग मानवी आयुर्मर्यादेंतही छाटाछाटी करावी लागते. वरवर पाहाणाऱ्यास मोटारींतील माणूस स्वस्थ बसलासा दिसतो खरा पण यांत्रिक गतीच्या मानानें शास्त्रीय दृष्टया रुधिराभिसरण इत्यादि शारीरिक आंतरक्रिया त्याच वेगानें चालू असतात, अर्थात्, वेगाच्या मानानें आयुष्यांत फरक झालाच पाहिजे " ( पान ९६ यशोविलास ) आहे कीं नाहीं हें अभिनव तत्वज्ञान ? या विचारांचा फोलपणा सिद्ध करण्यासाठीं वरील उतारा देणेंच पुरेसें आहे.

पण आधुनिक यांत्रिक सुधारणेच्या विरुद्ध जरी कोरेकल असले तरी आपल्या समाजातील दोषाकडे त्याचें दुर्लक्ष नाहीं अस्पृश्योद्धारांची जाणीव त्यांना आहे व त्या प्रश्नाकडे दुर्लक्ष केल्यामुळे आपल्या समाजाची केवढी हानी झाली आहे याची त्यांना जाणीव आहे ते म्हणतात ( पान १३८ यशोविलास ) " पण असल्याच विषारी फुत्कारानें व वरिष्ठ जातीकडून पदोपदीं होत असलेल्या निर्भर्त्सनेनें लाखो शूद्र, अतिशूद्र बाटून परधर्मीय बनले. तितके लाख हिंदबंधु आम्ही विनाकारण गमावून बसलों ना ? आधीच्या मूर्तिपूजकांना, भक्तांना पर्यायानें आम्हीच ना मूर्तिभंजक बनविलें ? भविष्यकाळांतील वाढणारी शताधिक संख्या आज शतपटीनें कमी केली ! उरलेल्यांचीही तशीच दैना चालू ठेविल्यामुळें संकटकालीं धावून मदत करणारेच नित्य नवी संकटें उपस्थित करूं लागले. पूर्वींचे जीवाला जीव देणारे आमचे दासानुदास शूद्र आज जीव घेण्याकरितां टपून बसण्याइतके द्वेषी बनले " या उद्गारामागील तळमळ उत्कट आहे. पण सक्रिय सुधारणेंत कोरेकल शाब्दिक सहानुभूतीच्या पलीकडे जात नाहींत. " आम्ही आमची वागणूक सौम्यपणाची आणि तशीच जीभ तेवढी ताब्यांत ठेविली असती तर अशी पाळी आज कधीहि येतीना " असें ते म्हणतात. पण निवळ सौम्य वागणुकीनें व जीभ ताब्यांत ठेविल्यानें या रोगाचा उपचार होऊं शकत नाहीं हें कोरेकलांनी ओळखण्यास हवें. अस्पृश्यतेचे

पूर्णपणें निर्मूलन होण्यांतच समाजाचा उद्धार आहे. हें आतां जितक्या लवकर होईल तितकें बरें.

आतांपर्यंत कोरेकलांच्या 'विचार वैभव' व 'यशोविलास' या संबंधीं विवेचन झालें. आतां त्यांचें वाङ्मयीन महत्वाचें पुस्तक "कौस्तुभ किरणाकडे" वळूं. या पुस्तकांत एकंदरीत सोळा निबंध व लघुकथा आल्या आहेत. लघुकथा ज्यांना म्हणतां येईल अशा फक्त दोन तीनच आहेत. "हवापाणी," "हलवा आणि पाजा," "शिर्रर्रर्र" व "गोष्टीची गोष्ट" या त्या गोष्टी होत. पण एकंदरीत पाहतां कोरेकलांना लघुकथा लिहिणें साधत नाहीं असें दिसतें. कारण हवापाणी या गोष्टींत एका गोष्टीवर मन आकर्षून बसेलच असें नाहीं. पाल्हाळ बराच झाला आहे. तसेच हलवा आणि पाजा ही गोष्ट जुनीच आहे. 'Shake before you give' या सुप्रसिद्ध वाक्यावरूनच ही गोष्ट घेतलेली आहे. तसेंच 'वादव्यर्थ' या या गोष्टींतील आबाराया या शब्दावर कोटी केली आहे ती सुद्धां जुनीच वाटते. गाढवाला खुद्द म्हणून धोतरावर खुद्द उभे ही गोष्ट पण तशीच आहे. 'आप तो आप ही है' अशी कोटी गाढवाबद्दल म्हटलेली हैद्राबादेत कोणी ऐकिली नसेल? कोरेकलांच्यां लघुनिबंधांतील वैशिष्ठ्य मात्र मनाला तावडतोब जाणवते. त्यांच्या लघुनिबंधांत गोड सात्विकपणा प्रतीत होतो. दुराग्रह नाहीं, कुणावर उपरोधिक टीका नाही; प्रतिपक्षांची हेटाळणी नाहीं, कुणाचा हेवादावा नाहीं. निरीक्षणानें जें सुचेल तें शांतपणें व स्पष्टपणें लिहायचें. त्यांचे निबंध वाचतांना नंदादीप शांतपणें जळत असलेल्या खोलीत गेल्याचा भास होतो व एका तपस्वी व विचारवंत व्यक्तीशीं हळु हळु आवाजांत बोलतों आहों असें वाटतें. गडबड नाहीं, धडपड नाहीं, बाहेरील कोलाहलाचा अस्पष्ट ध्वनि ऐकूं येत आहे. पण मनाला जाणवत नाहीं असें त्याच्या लेखनाचें स्वरूप आहे. त्यांच्या निबंधांतील मृत्यूचे उल्लेख सुद्धां कसे सह्य व शांत वाटतात. त्यांच्या एकंदर लिखाणांत मेरुमणि शोभणारा हरिणावरील निबंध पहा. कलावतीचे वादन ऐकतां ऐकतां तिच्या प्रियकराच्या हातून त्याला मृत्यू आला. पण मरणापूर्वी कुरंग म्हणतो,

"हा हतभागी मधुरालाप लोलुप कुरंग कलादीप पतंग जगाला मोडून चालला तरी श्रवण भाग्याच्या उच्चशिखरावरून ! पण गे परम भाग्यवती कलादेवते, तूं मात्र चिरंत जगांत जगून रहा. वादन बंद करतांच माझ्या या शिगांच्या खुटीस बंद अडकावून बीन बांधून ठेवीत जा. जेव्हां जेव्हां म्हणून वाजवायाचा असेल तेव्हां तेव्हां माझ्या अजिनावर बसून आलाप छेडीत जा! रोम रोम मला ऋणी करून सोडलें आहेस कले." ( पान १८ कौस्तुभकिरण ) या निबंधाची सुरवात पण किति वैशिष्टपूर्ण आहे पहा.

'काय म्हणून कुरंग म्हणतात कोण जाणें, हरिणाचे पाणीदार डोळे साहित्यशास्त्रांत कमलाच्या जोडीनेंच नव्हे तर वरचढीनें मान्यतेला पावलेले! चित्ताकर्षक सडपातळ देहयष्टि, लांबसडक चचल पाय ! दोन शिगे म्हणजे सौंदर्यविजयाचे दोन बुरुजावरील रोवलेले झेडे जणू ! ! अशा सर्वांग सुंदर प्राण्याच्या रंगांतही नांव ठेवण्यासारखे व्यंग मुळींच नसतांना कु-रंग हे नांव पडलें तें पडलेंच."

कोरेकलांच्या भाषेंत क्लिष्टपणा हा मोठा दोष आहे. कदाचित् वेदांत वाङ्मयाच्या गाढ अभ्यासामुळें हा दोष त्यांच्यांत शिरला असेल. काय असेल ते असो पण प्रयत्न केल्याशिवाय त्यांना साधी भाषा लिहितांच येत नाहीं असें दिसतें. याचें एक उदाहरण वर दिलें आहे. आणखी एकच उदाहरण पहा.

"चार शब्द मी लिहावेत असा माझ्या निरतिशय सौहार्द संपन्न, परम प्रेमल सुप्रसिद्ध-वैशिष्ठ्यानें सबंध महाराष्ट्रास सुपरिचित साहित्यिक "साहित्य शार्दूल" प्रो. श्री. श्री. नी. चापेकर जे "शारदोपासक मंडळा" चे मुख्याधिष्ठान-भूत-चैतन्य-सर्वस्व होत त्यांची परमप्रेमळ आज्ञा म्हणून अधिकारानधिकार विचार ही सहेतुकपणें बाजूस सारून शिवाय माझ्याही एका पुस्तकात्मक भागाच्या, ऐन प्रकाशन प्रसंगांतील कार्य बाहुल्याच्या कचाटींतून सुद्धां शिरसामान्य करण्यास उद्युक्त झालों आहे. या व इतर

प्रकारच्या प्रस्तुत प्रसंगातील कांही प्रतिकूल परिस्थितींत ही परमप्रेमळ प्रो. बापूसाहेबांची हार्दिक आज्ञा तत्परिपूर्तता संशक्त ही करील असा माझा आत्मविश्वास सुद्धां आंतून मला लेखन प्रोत्साहन देत आहे."

उतारा मोठा आहे. तरी क्लिष्ट भाषेचा नमुना म्हणून देण्याचा मोह आवरला नाहीं. दुसरा दोष म्हटला म्हणजे कोरेकलांना पाल्हाळ पुष्कळ वेळां आवरतां येत नाहीं हें होय आणि विनोद करण्याच्या भरांत खरा विनोद न साधल्यामुळें कोरेकलांचा विनोद बेचव वाटतो. श्री. र. मु. जोशी म्हणतात.

"कांहीं वाक्यें एकदम रसहीन वाटतात. पहिल्याच निबंधांतील तिसऱ्या ओळीत "गोष्टीची जी पार्श्वभूमी माझ्या पाठीच्या उलट भागांत (हृदयांत) तयार झाली आहे ती वरून गोष्ट म्हणजे सकृत वाचनापुरते जन्माला येणारी वाचून होईपर्यंत वाचणारी अशी अल्पायुषा असतेच बहुतेक." यांतील "ष्टी" वरून "ष्टा" ची आठवण होऊन तो 'गोष्टा' बनली व त्यांत दुभत्या गाई दिसून "चहापुरतें पाव छटाक" वगैरे कोटचा ही सुरू झाल्या."

मुद्दाम विनोद करण्यास गेल्यानें बेचव विनोद निर्माण झाला. त्या उलट कोरेकलांनीं अजाणता विनोद कसा केला आहे तो पाहा. मुलींच्या समोर व्याख्यान देतांना आपण त्यांच्याशीं किती समरस झालों हें दाखविण्या करितां ते स्वतःला बालिका समजतात व "वेळ फार झाला नाहीं कां ? तर मग थांबत्येच मी आतां" (यशोविलास पान १६४) असें स्त्रियां सारखें उद्गार काढतात. वास्तविक पाहतां विनोद हा कोरेकलांचा प्रांत नव्हे. त्यांत मराठवाड्यापुरते फिरस्त्यांचें एकछत्री साम्राज्य आहे. तसेंच शृंगार हा पण कोरेकलांचा विषय नव्हे. पण केव्हां केव्हां या विरागी कर्मयोग्याच्या प्रतिभेचा विलास मनाला आश्चर्य चकित करतो. तरुणांच्या मनाला गुदगुल्या करणारा "कांटा" हा लेख याची साक्ष देईल. सात्विकतेच्या सोंवळया मर्यादाही न ओलांडता, लिहिलेला हा लेख कोरेकलांच्या,

हिरव्या पानांआड दडलेल्या गुलाबाच्या फुलासारख्या रसिकतेची साक्ष देईल. कांट्याबद्दल ते म्हणतात,

" असें नसतें तर बायकांच्या वेणींत, बुचड्यांत, अंबाड्यांत त्यास आपला शिरकाव करून घेतां आला नसता ! देशोदेशी एकमतानें दाही दिशांत नांवाजलेल्या नाजुकपणाच्या मूर्तिमंत जीवंत पुतळ्यांनीं त्यास शिरोधार्य केलेंच नसतें... ..कांट्यानें गुलाबाला अधिक महत्वास चढविलें म्हणूनच कीं काय मनोलोभनीय व कोमल गुलाबासारख्या सुंदर कोमलांगी स्त्रियांनीं सुद्धां कांट्याला आपलें शृंगार भूषण मानिलें......खोडकर वाऱ्याच्या चेष्टेखोर लहरीप्रमाणें वागणाऱ्या बेजबाबदार पदरास सांवरतां सांवरतां मग्न होणाऱ्या नाजुक हातांची या कठोर म्हणविणाऱ्या पिन कांट्यांनीं केवढी तरी सोय केली आहे !!!......अधिक तर काय, तापलेल्या नव्यांवर परतविला जात असतांना कोमलांगनेच्या केवळ मृदुल करांगुलिस्पर्शानें ( संक्रांतींतील हलव्यावर ? ) तिळभर जागेत किती तरी पण कायमचे मधुर कांटे उभे राहतात " ( पान ११२ ) वरील सारखे लेख लिहिण्याची कोरेकलांना वारंवार स्फूर्ति होत नाहीं हें आम्हा तरुणांचें केवळ दुर्दैव होय.

प्रासात्मक लिखाण हें कोरेकलांच्या भाषेचें एक वैशिष्ट्य म्हणतां येईल. व यांत त्यांच्या भाषेवर उर्दूचा परिणाम झाला आहे हें निस्संशय होय. सावरकरांनीं मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून भाषण करतांना मराठीच्या क्रियापद दारिद्र्यावर हल्ला चढवितांना, क्रियापद नसलेल्या वाक्यांची ही तरफदारी केली होती. " पल्ला लांबचा, संकटे फार, अंधार गुडुप, पण ज्याची हिम्मत दांडगी, त्यास पर्वा कशाची " अशा प्रकारची क्रियापदें नसलेलीं वाक्यें वापरण्यांत सुद्धां जोम असतो असें त्यांनीं सांगितलें होतें. कोरेकलांची प्रहसनांतून आढळणारी प्रासात्मक भाषा वैशिष्ठ्यपूर्ण आहे व आपलें प्रादेशिक स्वरूप दर्शवितें. श्री. जोशी आपल्या समीक्षणांत म्हणतात, " लेखक हे श्रेष्ट प्रतीचे उर्दू व फारशी असे

सव्यसाची भाषाकोविद आहेत. त्यामुळें न कळतच या भाषांचा त्यांच्या लेखनावर परिणाम झाला असावा. प्रासयुक्त लेखन व संवाद यांचें उर्दू भाषेंत फारच प्राचुर्य असतें.....या सर्व ग्रंथांत पावलोपावली आढळून येतें..... या प्रासात्मकतेमुळें कांही वाक्ये अगदींच सुंदर बनतात तो कांही रसापकर्षक व कृत्रिम होतात."

प्रासाची चर्चा करतांना उपमालंकारादि वैशिष्ठ्याची आठवण होते. कोरेकलांना उपमा देण्याची विशेष सवय नाहीं. कोटचा ते करतील पण उपमा क्वचितच. एखादी उपमा दिलीच तर एखाद्या शब्दांत न देतां वाक्येंच्या वाक्यें घालतील. म्याथ्यू अर्नाल्डची अशीच संवय असे. ( विचार वैभव पान ९९ ).

असो. आतांपर्यंत श्री कोरेकलांच्या विचारांचें व भाषेचें विवेचन झालें. Style is the man, शैलीवरून मनुष्याच्या स्वभावाची कल्पना येते. कोरेकलांचा व माझा प्रत्यक्ष परिचय नाहीं. इतकेंच काय त्यांना मी पाहिलें सुद्धां नाहीं पण त्यांच्या लिखाणावरून खालील गोष्टी आढळून येतात. त्यांच्या ग्रंथांचा विस्तार त्यांच्या लेखनाची आवड व दीर्घोद्योग दाखवितां, विचारांचें गांभीर्य त्यांच्या अभ्यासाचा खोलपणा व वेदांती विषयांची आवड दर्शविते. तर्कशुद्ध विचारसरणी त्यांच्या मताची निश्चिती दाखविते, भाषेचा नीटस क्लिष्टपणा त्यांच्या विद्वता प्रचुर भाषेचा अभ्यास व आवड दाखवितो. विचारावरून ते अत्यंत सात्विक व सदा विचारमग्न असावेत त्यांना अस्पृश्याविषयीं तळमळ वाटते व त्यांच्याविषयींच्या अनास्थेमुळें आपलें किती नुकसान होत आहे हें त्यांना कळतें पण वागणूक सौम्य व ती आटोक्यांत ठेविणें या पलीकडे हा प्रश्न निकालांत लावण्याचा सक्रिय उपाय त्यांना सुचत नाहीं. आधुनिक यांत्रिक सुधारणांचे ते कट्टर विरोधी दिसतात व त्यामुळेंच आमचे आयुष्य कमी झालें असे तें समजतात. त्यांना गडबड धडपड आवडत नाहीं. ते मितभाषी, शांत व समाधानी वृत्तीचें आहेत. अशा या कर्मयोग्याची उपेक्षा महाराष्ट्र करीत आहे हें दुर्दैव होय. मराठवाड्यांतील या वाङमय तपस्व्याला माझें नम्र अभिवादन असो.

# श्री. दत्तात्रय माधव कुळकर्णी.

तुळजापूरचे सुप्रसिद्ध साहित्यिक श्रीयुत दत्तात्रय माधव कुळकर्णी यांचें वय सध्यां त्रेपन्न वर्षांचें आहे. गेल्या पस्तीस वर्षांपासून त्यांची वाङ्मय सेवा अखंड चालली आहे. गुलबर्गा येथे पूर्वी प्रसिद्ध होत असलेल्या 'गुलबर्गा समाचार' या वर्तमानपत्रांत त्यांचा पहिला लेख प्रसिद्ध झाला. त्या वेळेपासून आतांपर्यंत महाराष्ट्रांतल्या बहुतेक नियतकालिकांतून त्यांचे लेख प्रसिद्ध झाले आहेत. बंगाली वाङ्मयांतील उत्तमोत्तम अशीं पुस्तकें त्यांनीं भाषांतरून मराठी वाङ्मयांत भर घातली आहे. 'विभा', 'राजर्षि', 'अरुणोदय', 'पद्माकुमारी', 'शांतिनिकेतन' इत्यादि कादंबऱ्यांचीं त्यांनीं स्वतंत्र भाषांतरें केली आहेत. तुळजापूरचें दुसरें साहित्यिक नारायणराव पेशवे वकील याचें सहकार्यानें 'आयेषा' व 'सौंदर्योपासक' या पुस्तकांचें भाषांतर त्यांनीं केलें आहे. यावरून त्याची वाङ्मय सेवा किती दांडगी आहे हें कळून येईल.

पण कुळकर्ण्यांची प्रसिद्धी त्यांच्या भाषांतरित पुस्तकांवर आधारली

नसून त्यांच्या स्वतंत्र व मौलिक अशा 'महाराष्ट्राची कुलस्वामिनी अर्थात् श्री तुळजा भवानी' या पुस्तकानें त्यांना महाराष्ट्रांतील साहित्यिकांत अढळ स्थान प्राप्त करून दिलें आहे. हें पुस्तक वाचण्याचा योग मला इ. स. १९१२ मध्ये माझ्या बाराव्या वर्षी आला होता. पण त्यावेळीं अर्थातच त्याचें इतकें महत्व वाटलें नाहीं. या पुस्तकाच्या 'आभार' प्रदर्शनांत श्रीयुत कुळकर्णी म्हणतात,

'माझ्या या प्रयत्नापासून इतिहासाला मदत व्हावी, भाविकांची गरज पूर्ण व्हावी, ललित कथा वाचणारांचें मनरंजन व्हावे इत्यादि हेतु मनांत धरून पुस्तकाची रचना यथामति केली आहे.' तुळजापुरावरील या वर्णनात्मक पुस्तकांत एकंदरीत सत्तावीस प्रकरणें आहेत. याशिवाय तुळजा-भवानीच्या स्तोत्र विषयक कवितांनी पहिली पाउणशे पानें व्यापिलीं आहेत व अस्सल कागद पत्रांच्या नकला परिशिष्टांत दिल्या आहेत. त्या पानांची संख्या जवळ जवळ साठ भरते. म्हणजे या पुस्तकाची एकूण पृष्टसंख्या साडेतीनशेपर्यंत आहे. पहिल्या चार प्रकरणांत तुळजाभवानीस तुळजापुरास येण्यास काय कारण घडले याचा इतिहास देण्यांत आला आहे. पुढील तीन प्रकरणांत तुळजापूरचें व देवळाचें वर्णन आहे. आठव्या प्रकरणांत देवीच्या देवळांतील कामाची वाटणी कशी काय केली गेली आहे याचें वर्णन आहे. नवव्या व दहाव्या प्रकरणांत पूजेचें वर्णन आलें आहे. अकरा व बाराव्या प्रकरणांत देवीवरील दागिन्यांचा तपशील दिला आहे. तेराव्या प्रकरणांत शिवाजी महाराजावर तुळजाभवानीची कृपा कशी व किती होती याचें विवेचन केलें आहे. चवदापासून सतरा प्रकरणांपर्यंत निरनिराळ्या सणावारांचे वर्णन आलें आहे. अठराव्या प्रकरणांत देवळाच्या खर्चाची व्यवस्था दाखविण्यांत आली आहे. एकोणीस व विसाव्या प्रकरणांत तुळजापुरांतील निरनिराळ्या क्षेत्रांचीं वर्णनें आहेत. एकविसाव्या प्रकरणांत यात्रेचा विधि सांगितला आहे. बाविसाव्या प्रकरणांत निरनिराळ्या मठांची माहिती आली आहे. पुढील तीन प्रकरणांत तुळजापूरचा इतिहास देण्यांत आला आहे.

वरील विभागणीवरून दिसून येईल की, या पुस्तकांत तुळजाभवानी-ना पौराणिक व ऐतिहासिक पुस्तकातून येणारे उल्लेख, तुळजापूर गांवचा इतिहास, त्यांतील प्रेक्षणीय स्थळे व देवींची पूजा वगैरेचे विधि इतक्यांचें वर्णन आले आहे प्रथम तुळजा या शब्दाचा उत्पत्ति लावतांना कुळकर्णी म्हणतात की, त्वरिता या नांवाचा अपभ्रंश होऊन तुरजा झाला व तुरजाचें तुळजा झालें. तुळजाभवानीचा अवतार मेरू पर्वतावर मंदाकिनी नदीच्या काठी तपश्चर्या करीत असलेल्या अनुभूती नांवाच्या विधवा तापसीच्या रक्षणाकरितां झाला. कुकुर नांवाच्या राक्षसाने अनुभूतीची अभिलाषा धरली व तिला स्पर्श केला. त्यावेळी अनुभूतीनें देवीची करुणा भाकली देवीनें प्रगट होऊन दैत्याचा वध केला. अनुभूतीनें सदा सान्निध्याचा वर मागितला व तेव्हा पासून तिला देवीचें सान्निध्य लाभलें देवीच्या मूर्तीवर अद्याप अनुभूतीची मूर्ति आहे. या नंतर त्रेतायुगात श्री रामचंद्र सीतेचा शोध करीत दंडकारण्यांत हिंडत असताना देवीनें या यमुनाचल पर्वतावर श्री रामाची भेट घेतली व त्यांना सीता प्राप्तीचा वर दिला तेव्हा पासून देवीला रामवरदायिनी असें नांव मिळाले.

तुळजाभवानीच्या अवताराचा हा असा इतिहास आहे. तिचें तुळजापूरला येण्याचें कारण रामाची भेट घेणें हेंच होते. हा पुराणांतरीचा उल्लेख झाला पण ऐतिहासिक दृष्टीने तुळजाभवानीची स्थापना तुळजापुरास कुणी केली व कधी केली हा महत्त्वाचा प्रश्न आहे या बाबतीत जुने उल्लेख बहुतेक सापडत नाहीत कुळकर्णी म्हणतात,

"दंडकारण्यात आर्यांची वसाहत होत असतां या वसाहतीला असुरांकडून भयंकर अडथळे झाले त्या दैत्याचा निःपात करून भवानीनें आर्यांची वसाहत येथे स्थापन केली दक्षिणेंत यामुळे भवानीचे महत्व फार आहे." वाल्मीकी रामायणात रामवरदायिनीचा दाखला असल्यास त्याचा उल्लेख कुळकर्ण्यांनी केला नाही त्यामुळे भवानी पूजेचे महत्त्व श्रीरामकाला-पासून दक्षिणेंत चालू झाले कां त्याच्या अलीकडे सुरू झाले याचा कयास

करतां येत नाहीं. तुळजाभवानीचा उल्लेख स्कंदपुराण, अग्निपुराण व देवी-भागवतांतून आला आहे. त्यांतल्या त्यांत स्कंदपुराणांतर्गत सह्याद्रि खंडांत तुरजा–माहात्म्य आलें आहे. सह्याद्रि खंडाचा काल अगदी अलीकडला असला तरी सर्व साधारणपणें पुराणाचा काल इसवी सनाचें पांचवें शतक असें धरण्यांत येतें. यावरून तुळजाभवानीचें माहात्म्य इ. स. दुसऱ्या किंवा तिसऱ्या शतकांत सुरू झालें असावें असा अदाज निघतो बौद्ध व जैन धर्माच्या भरभराटीचा तो काळ होता. दक्षिणेत त्यावेळी शातवाहनांचें राज्य चालू होतें. बौद्ध धर्माचा ऱ्हास सुरू झाल्यावर वैदिक मताचा पुन्हां उदय झाला व त्या बरोबरच तंत्र विद्या पुन्हां प्रसार पावली. त्या काळांतच तुळजापूरचा उदय झाला असला पाहिजे किंबहुना बौद्ध व जैन धर्माच्या उन्नतीला पायबंद बसावा म्हणूनच या भागांत देवी पूजेचें माहात्म्य सुरू झालें असावें तुळजापूरच्या आसमंतात जैनांची प्रेक्षणीय स्थळे आहेत. कुंभलगिरीचें जैन देवालय व उस्मानाबाद येथील जैन लेणी ही या भागांतील जैनांची उत्तम स्थळे म्हणून दाखवितां येतील फार काय खुद्द तुळजाभवानी-च्या देवळांत आलमा नांवाच्या जैन देवीचें देऊळ आहे ( पान ४६ ) व या देवीची पूजा रोज होते. जैन देवतांचा प्रवेश या देवळांत कसा झाला हें एक कोडे आहे. माझ्या मतें या देवीचें अस्तित्वच तुळजाभवानीचा काळ कोणता हें दाखविण्यास समर्थ ठरतें. बौद्ध व जैन धर्माच्या ऱ्हासाबरोबरच भवानी पूजेचें माहात्म्य वाढलें असावें असें माझें स्पष्ट मत आहे आणि हा काळ म्हणजे इ. सनाचें तिसरें शतक हें असावें. बौद्ध धर्माचें खंडन करून अद्वैत मताची पुन्हां स्थापना करणारे आद्य शंकराचार्य यांनीं देवीची स्थापना केली अशी एक दंतकथा खुद्द तुळजापुरी प्रचलित आहे त्याचा उल्लेख कुळकर्ण्यांनी केला नाहीं. अद्यापि देवीची पूजा पुजाऱ्याशिवाय फक्त शृंगेरी पीठाचे शंकराचार्यच करू शकतात असें म्हणतात. आद्य शंकराचार्यांनीं देवीची स्थापना केली. ही दंतकथा मानली तरी तुळजाभवानीच्या माहात्म्याचा काळ त्यापूर्वीचा होता हें निर्विवाद आहे. याच विधीविषयीं लिहितांना श्री. कुळकर्णी लिहितात, " देवीचा नवीन भक्त होण्यास माळ, परडी व पोत

घ्यावा लागतो. माळ कवड्यांची लागते. परडी वेळूची असते व पोत नवीन कापडाचा केलेला असतो. या कवड्यांच्या माळेंत कांहीं ऐतिहासिक रहस्य असावें अशी आमची समजूत आहे " ( पान ९७ )

माझ्या मतें कवड्यांच्या माळेची उपपत्ति लावणें कठीण नाहीं. इ. सनाच्या चवथ्या शतकांच्या सुमारास व पुढें कित्येक शतकेपर्यंत लोकांचें देवघेवीचें व व्यापारांचें नाणें म्हणजे कवड्याच होत्या यावरून कवड्याच्या माळेची पद्धत प्रचारांत असावी. पुढे होनांची माळ, पुतळ्यांची माळ किंवा मोहारांची माळ देवीला देण्याची पद्धत निघाली. तशी गरीब लोकांना कवड्यांची माळ देवीला वाहणें सोयीचें वाटलें असावें. याशिवाय दुसरें कांही ऐतिहासिक रहस्य त्यांत नसावें असें वाटतें. यानतर सात-आठशे वर्षांपर्यंत तुळजाभवानीचा उल्लेख सांपडत नाही. शके ११२६ च्या ताम्रपटात कुलस्वामिनी तुकाईचा उल्लेख आहे. हा काल यादव राजघराण्याचा आहे व ज्ञानेश्वरीच्या पूर्वीचा आहे. त्यानंतर शके १३०० च्या सुमारास नृसिह भारती स्वामीचा काळ असावा. त्यांच्या चरित्रांत तुळजा भवानीचा उल्लेख आला आहे. पण तुळजा भवानीला अखिल महाराष्ट्राची कुलस्वामीनी म्हणून संबोधण्यास सर्वांत मोठें कारण म्हणजे शिवाजी महाराजांचा उदय व भोसलें कुलांचे महाराष्ट्रांतील वर्चस्व होय. नागपूर, कोल्हापूर, सातारा, तंजावर व अक्कलकोट येथें भोसल्यांचीं राज्यें स्थापना झालीं व त्यांनी तुळजा भवानीचा संदेश महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यांत पोहोचविला. 'यश जगदंबेचें, तुळजा प्रसन्न शिवरायाला' हा घोष अखिल महाराष्ट्रांत दुमदुमू लागला. भोसले कुलावर तुळजा भवानीची एक सतत कृपा होत गेली याचे रसभरित वर्णन कुळकर्ण्यांनीं केलें आहे.

'शिवाजी महाराज प्रत्येक कार्याचें प्रसंगी श्री. तुळजा भवानीचें ध्यान करीत. नंतर त्यांचें अंगीं श्रीचा अविर्भाव होई व जे संकट असेल तत्संबंधीं श्रीकडून एकंदर खुलासा होत असे. या संबंधीं शिव दिग्विजयकार म्हणतो. 'श्रीनीं महाराजांच्या अंगीं यावें ते समयीं बाळाजीनीं एकटे जवळ

असावें यांस जो विचार करावयाचा असेल तो पूर्वीच सांगावा तो श्रीस प्रार्थना करून विचाराचा. उत्तर होईल तें लिहून ठेवावें नंतर महाराजास दाखवावें. बेताप्रमाणें करावें.' ( पान ८० )

या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत दत्तो अप्पाजी तुळजापूरकर ( भास्र रामायणकर्ते ) म्हणतात.

'अशा रीतीनें महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापनेच्या कार्यांत जिची प्रेरणा व जिचें साध्य कारणीभूत झालें ती श्री तुळजा भवानी महाराष्ट्राची कुलस्वामीनी झाली यांत नवल काय ? धार्मिक दृष्टया तुळजापूर क्षेत्राचें महत्व कमी आहे असें मी म्हणत नाहीं पण ह्या क्षेत्राला जे एक प्रकारचें वैशिष्टय आलें आहे तें वरील कारणाकरितां होय. मराठी साम्राज्याचा इतिहास वाचणारा असा कोणता महाराष्ट्र वाचक असेल की, ज्याची दृष्टी तुळजापूर क्षेत्राकडे अभिमानानें वळणार नाहीं.' ( पान ७ )

अफजलखानाच्या धामधुमींत तुळजा भवानीची मूर्ति भंगली गेली कीं, भोप्यांनीं पळविली हा इतिहासांतला एक वादग्रस्त प्रश्न आहे व अद्यापर्यंत त्यांची चर्चाहि कोठें झाली नाहीं. हा मुद्दा कुळकर्ण्यांनीं प्रथमच उपस्थित केलेला आहे व अशा रीतीनें चर्चेला तोंड फोडलें आहे. त्या काळचा इतिहास बखरींतून सांगितला गेला आहे. सभासदाची बखर. भोसले यांची बखर, शिवछत्रपतींची बखर, चित्रगुप्ताची बखर, शिवदिग्विजय व चिटणीसाची बखर या त्या बखरी होत. त्या पैकीं अज्ञानदासच्या पोवाड्यांत, सभासदाची बखर, भोसल्यांची बखर यांत मूर्ति फोडल्याचा उल्लेख आहे. बाकीत मूर्ति भोप्यांनीं पळविल्याचा उल्लेख आहे सभासदांचा काळ घडित गोष्टींना जवळचा असल्यामुळें मूर्तिभंगाचा पुरावा खरा असावासा वाटतो. पण चिटणीसाच्या बखरीतील उतारेहि अधिकृत आहेत. अज्ञानदासाच्या पोवाड्यांत अतिशयोक्ति आहे. दत्तोपंत कुळकर्ण्यांनीं या बाबतींत सांगोपांग चर्चा करून मूर्ति पळविली असणेंच संभवनीय असें ठरविलें आहे. या गोष्टीचें महत्व विशेष नाहीं असें श्रीयुत तुळजापूरकर प्रस्तावनेंत म्हणतात पण

मनाला हें विधान पटत नाहीं. आज त्या गोष्टीला फक्त ऐतिहासिक महत्व उरल्यामुळें निर्विकार मनानें चर्चा करण्यास हरकत नाहीं. माझ्या मतें आदिलशाहीच्या इतिहासाच्या फारशी साधनांत अधिकृत माहिती मिळण्याचा जास्त संभव आहे. तूर्त तरी तर्काशिवाय दुसरें गत्यंतर नाहीं. मोंगल राजवटींत तुळजापूर गांव रावरंभा निंबाळकर यांना जहागीर म्हणून देण्यांत आलें. हें निंबाळकराचें घराणें अद्यापि भूमला नांदत आहे. या घराण्याचे मूळ संस्थापक रंभाजी बाजी निंबाळकर हे फलटणचे बजाजी निंबाळकर यांचें नातू व शिवाजी महाराजांचे जामात महादजी निंबाळकर यांचें पुत्र होत. निंबाळकरांकडून हे गांव इ. स. १७८८ च्या सुमारास त्यांचें जामात कल्याणराव कवडे यांना देण्यांत आलें कवडयांचें घराणें अद्याप उस्मानाबाद जिल्ह्यांत अपशिंग व वाशी येथें नांदत आहे. तुळजापूर जहागीर इ. स. १८१९ च्या सुमारास खालसा झालें तेव्हांपासून इंग्रजी कमिशनरीची पांच वर्षे वजा जातां हें गांव आपल्या भाग्यशाली संस्थानांत नांदत आहे.

असा तुळजापूरचा इतिहास आहे. त्याचें सांगोपांग वर्णन कुळकर्ण्यांनीं केलें आहे. शक्य तितकी माहिती त्यांनी गोळा केली आहे. तुळजापुरांत असलेले मठ व त्यांतील जुने कागदपत्र त्यांनी हाताळले आहेत व त्यापैकी बरेच परिशिष्टांत छापले आहेत. शाहूमहाराज, माधवराव पेशवे, सदाशिवराव भाऊ, रावरंभा निंबाळकर इत्यादि इतिहास प्रसिद्ध व्यक्तींचीं पत्रें छापलीं आहेत. गांवांतील उपाध्यायाकडे यात्रेकरितां येऊन पत्रें लिहून देणाऱ्या मंडळींत महादाजी शिंदे, दमाजी गायकवाड, आनंदीबाई पेशवे, गहनाबाई गायकवाड, फलटणचे निंबाळकर इत्यादीं मंडळी आहेत. त्यांचीं पत्रें वाचनीय आहेत. तसेंच कागदपत्राच्या नकलावरून त्या काळची सामाजिक परिस्थिति उत्तम प्रकारें समजते. वतनाबाबत कसे कज्जे होते. वतनाचे हक्क संपादन करण्याकरितां प्रसंगीं धर्मांतर करण्यास सुद्धां कसें मागें पुढें पहात नसत यांची माहिती हवी असल्यास लेखांक नंबर अठरा वाचून पहावा. तसेंच पूर्वीचे हक्क व मानपान कसे असत याची माहिती लेखांक नंबर सतरा मध्यें दिली आहे. 'तो महजर आहे. व वतन मिरास फर्मान

हुमायून शरफसदूर जाहला' अशी त्याची सुरवात आहे महजर मध्यें ९१० हिजरी शक आहे. हा हुमायून बादशाह आदिलशाहींत झाला नाहीं व बहामनी घराण्याचा किंवा मोगल घराण्याच्या हुमायूनचा शक जुळत नाहीं तर हा कोण असावा अशी श्रीयुत कुळकर्ण्यांना शंका आहे. पण आमच्या मतें येथें हुमायूं हा शब्द व्यक्ति वाचक नसून गुण वाचक आहे व या शब्दाचा संबंध कोणा बादशाहाच्या नांवाशीं नाहीं. लेखांक नंबर सोळा व पंधरा वरून असें दिसतें कीं पूर्वी तुळजापुरचा फाजील कोणी इनेबारखान म्हणून होता. त्यास हेळ अमृतराव यांनीं मागलें व त्यांच्या कडून भुने यांस पाटीलपण मिळालें याबद्दलच्या हकीकती मोठ्या मनोरंजक आहेत.

तुळजापूरचा इतिहास दिल्यावर कुळकर्ण्यांनीं पूजेचा व देवळांतील व्यवस्थेचा तपशील सांगितला आहे. पूजेचे निरनिराळे प्रकार पुजाऱ्यांची व सेवेकऱ्यांचीं कामे, जामदारखान्यांतील दागिन्यांचा तपशील व त्यांची किंमत ही प्रकरणें वाचण्यासारखी आहेत. विशेषत: देवालयाच्या खर्चाची व्यवस्था दाखविलेली आहे. देवालयाच्या खर्चाकरितां खुंटफळीचा कर व कल्लोळतीर्थावरचा कर घेत असत. त्यांत इतर लोकांच्या हक्कदाऱ्या असत. त्या सर्वांचा तपशील कुळकर्ण्यांनीं दिला आहे. आतां बहुतेकांचे हक्क कल्लोळ तीर्थांत विसर्जन पावल्यामुळें या प्रकरणास फक्त ऐतिहासिक महत्व उरलें आहे. हक्कदार लोकांत पीर गडबड शहाचें नांव व ईद काजी, रमजान व बकरीद याबाबतचे खर्च पाहून पुष्कळांना मौज वाटेल. गडबडशहा ही व्यक्ति एकाकाळीं महत्वाची होती असें दिसतें.

लेखांक नंबर एकवीस मधे खालील उल्लेख रामवरदायिनी विषयीं आहे.

"त्यावेळीं आमर बादशाहाचे कामदार इतबारखां एक व दुसरे खंडेराव वाळके सुखसे हे उभयता व तिसरे गडबडशा वली हे तिन्ही मिळोन अनागोंदीहून गंडकी शिळाची मूर्ति आणोन सन हिजरींत स्थापन केली."

आनांपूर्वीचे हक्क बहुतेक जाऊन गुत्यावर लिलांव करण्याची चाल सुरू झालं. आहे असें ऐकण्यांत आहे असें असेल तर गतकालाची माहिती म्हणून या पुस्तकाचें महत्व जास्तच आहे. अशा प्रकारचें पुस्तक लिहून श्रीयुत कुळकर्ण्यांनीं मराठीं वाङमयांत एक बहुमोल भर टाकली आहे. क्षेत्र वर्णनपर पुस्तकें आपल्या वाङमयांत एकदरीनें कमीच, नाहीं म्हणावयास मराठवाड्यांतील रहिवासी श्री. घाणेकर यांचें सोळा पानी 'तुळजापूर वर्णन,' इयादि पुस्तकें झालीं आहेत पण कुळकर्ण्यांच्या पुस्तकांचें अपूर्वत्व विशेष आहे. त्यांनीं एका क्षेत्राचा सांगोपांग इतिहास लिहिला आहे. अस्सल कागदपत्र छापून काढले आहेत. देवळांतील व्यवस्था बारकाईनें दिलीं आहे. प्रेक्षणीय स्थळांची माहिती दिली आहे. अशा प्रकारें हें पुस्तक अनुकरणीय झाले आहे.

श्री. कुळकर्ण्यांची भाषा प्रभावी व लालित्यपूर्ण आहे. इतिहासाभ्यासकांच्या कष्टाळूपणाला त्यांनीं ललित लेखकाचा रसिकपणा व भक्तांची श्रद्धा यांची जोड दिल्यामुळें या पुस्तकांत या गुणांचा त्रिवेणी संगम झाला आहे त्यांच्या ओघवती भाषेचे नमूने पहा.

" रात्रीची प्रशांत वेळ वायु मंद गतीनें वहात असलेला, आकाशांत तारे चकचकत असलेले, चद्रबिंब किंचित् वर आलेलें, अशा वेळीं देवालयांतील दीपमाळा पेटविलेल्या असतात. हातीं पोत घेऊन जिकडे तिकडे लोकांचे थवेच्या थवे उभे असतात. प्रकाशाची जणुं कमताईच आहे कीं काय असें वाटून विजेचे दिवे त्या प्रकाशांत आपली भर टाकण्याचा प्रयत्न करीत असतात. यावेळीं देवालय इतके प्रकाशमय होतें, प्रकाशाचा इतका लखलखाट असतो कीं प्रेक्षकांचे डोळे दिपून जातात त्यांच्या डोळयाला तें तेज असह्य होतें." (पान ५०)

दुसरा नमूना पहा

"ही रंगदेवता पाहून कोण अभागी प्रसन्न होणार नाहीं ? कोणाला देहभान असल्याचा अनुभव येईल ? प्रपंचांतील खडतर वेदनांचें

विस्मरण न होणारा असा प्राणी त्या आनंदसागरांत मिळणेंच अशक्य ! त्रिपुरसुंदरी, आनंदयामिनी मंगल देवतेचा तोच विना निघालेला, अशा वेळी दु:ख, अप्रसन्नता, निराशा, वेदना याचीं देवालयांत रीघ होण्याची सक्त मनाई आहे ! " (पान ५०)

उत्कट वर्णनाचा हा मासला पहा:–

" तुळजाभवानी हें अखिल महाराष्ट्रीयांचें कुलदैवत आहे तुळजाभवानी ही सर्व हिंदूंची आराध्य देवता आहे. तुळजाभवानी ही क्षत्रियांची कुलस्वामिनी आहे. तुळजाभवानी ही महाराष्ट्रीयांची प्राणशक्ति व चैतन्य देवता आहे. तुळजाभवानी ही महाराष्ट्रीयांना संकटांपासून मुक्त करणारी, त्यांचें ऐश्वर्य वाढविणारी, त्याना स्फूर्ति देणारी आणि त्यांचा सर्वत्र उदय करणारी आहे आनंद समुद्राला पूर भरत आलेले असून त्याच्या लाटा चोहोंकडे मोठमोठ्यानें आदळत असतात व त्यांच्या त्या आदळण्याच्या शब्दांत सदानंदीचा उदयोस्तु ! हा नाद ऐकूं येतो ! "

पुढील उतारा एखाद्या कादंबरीतील आहे कीं, काय असें वाटण्यासारखें आहे.

"आकाश एकदम कोसळून जर आपला अंत होईल, किंवा धरणी दुभंग होऊन जर तिच्या पोटांत आपल्याला स्थळ मिळेल किंवा एकदम प्रज्वलित अग्नि नारायण प्रगट होऊन आपली आहुति या वेळीं घेईल तर बरें असें अनुभूतीला वाटलें. कारण, वन निर्जन, आपण अशक्त तापसी व प्रसंग दारुण दैत्याशीं असुराच्या करस्पर्शानें अनुभूतीच्या शरीरास विजे प्रमाणें धक्का बसला होता. तिच्या मस्तकावर जणू वज्राघातच झाला होता ! संतापानें तिच्या शरीरांतील रक्तवाहिन्या फुगल्या होत्या ! ती थरथर कांपू लागली होती ! "

वरील उतारे पुरेसे आंहेत. श्रीयुत कुळकर्णी हे नुसते इतिहासज्ञ किंवा श्रद्धावान असे भक्तच नाहीत तर ते काव्यात्म पण आहेत. त्यांचे पुस्तक

म्हणजे कोरडी रखरखीत अशी ऐतिहासिक कैफियत नाहीं. किंवा अंधश्रद्धेनें बुजबुजलेलें किंवा मनास न पटणाऱ्या लोकोत्तर चमत्कारांनीं भरलेलें निरुपयोगी बाड नाहीं. विशिष्ट पक्षाभिनिवेष त्यांच्यांत नाहीं. ते एक निरलस असे संशोधक आहेत व आपल्या संशोधनाला काव्यरूप कसें द्यावें हें ते जाणतात. आपलीं क्षेत्रें म्हणजे राष्ट्राचा जीवंत इतिहासच होय. महादाजी शिंदे, दमाजी गायकवाड, माधवराव पेशवे, शाहू महाराज इत्यादि लोकोत्तर व्यक्तींची पत्रें तुळजापूरच्या क्षेत्रोपाध्यांच्या घरांत पाहून मनांत भावनांचे केवढे तरी कढ येतात. ज्या महाभागांनीं महाराष्ट्र बनविला आहे व त्यांचे वास्तव्य ज्या क्षेत्रांत झालें आहे, त्यांच्या कार्याला ज्या कुलस्वामिनीचें अधिष्ठान लाभलें आहे त्या विषयीं विचार करतां आनंदानें, अभिमानानें व गर्वानें छाती फुगणार नाहीं. असा कोण अभागी असूं शकेल ? अशा क्षेत्राचा इतिहास कुळकर्ण्यांनीं लिहिला आहे. आपल्या मराठवाड्यांत गाणगापूर, माहूर औंढ्या नागनाथ, परळी वैजनाथ इत्यादि क्षेत्रें आहेत. त्यांचे इतिहास असेच लिहिले गेले तर केवढे मोठें राष्ट्र-कार्य होईल. कुळकर्ण्यांच्या या पुस्तकानें कुणास तशीं पुस्तकें लिहिण्याची स्फूर्ति झाली तरी सुद्धां हें पुस्तक लिहिण्याचा हेतु पूर्ण झाला असें म्हणतां येईल.

पुस्तकाला सूचीचा अभाव हा एक दोष म्हणतां येईल. तसेंच रचनेचा शिथीलपणाही जाणवतो इतिहासाचीं प्रकरणें स्वतंत्रपणें दिलीं असती तर बरें झालें असतें. शिवाजी महाराजावरील देवीची कृपा व त्याचा स्वराज्य-कार्यावर झालेला परिणाम याचा उल्लेख एका प्रकरणात देऊन मध्यें यात्रेच्या विधीवर व उत्सव दिनावर बरीच प्रकरणें खर्ची घातलीं आहेत. त्यामुळें सुसंगतवार माहिती मिळणें कठीण होतें नवसाचें व्यापारी करार म्हणून समर्थन केलें आहे त्याची हजीरी श्री. तुळजापूरकरांनीं खालील शब्दात घेतली आहे.

" नवसाला व्यापारी करारांचें स्वरूप देऊन तुम्ही पुस्तकाच्या पंधराव्या प्रकरणांत नवसाचें समर्थन करण्याचा जो यत्न केला आहे व

नवसाला धुडकावून देणाऱ्या साधुसंतांच्या अंगावरही जातां जातां जो शितोडा उडविला आहे तो मात्र अत्यंत हास्यास्पद आहे. नवसाचें इतकें विचित्र समर्थन आजपर्यंत कोणीही केलें नसेल. नवसाची उत्पत्ति देव भोळेपणांत व देवाविषयीं वाटणाऱ्या भीतींत आहे ! "

( प्रस्तावना पान ११ )

असो. हे दोष लहान सहान व क्षुद्र आहेत. त्यानें पुस्तकाचें मौलिक महत्व कमी होत नाही. आपल्या खाजगी जीवनांत ते एक सात्विक, श्रद्धावान व प्रेमळ गृहस्थ म्हणून ओळखले जातात. त्यांच्या हातून उत्तरोत्तर अशीच वाङमय सेवा घडो हीच श्री जगदंबेच्या चरणी प्रार्थना आहे. या वाङमय सेवकाला माझा नम्र प्रणाम असो.

---

# दिवाकर कृष्ण केळकर

निजाम महाराष्ट्रांतील कोणत्याहि साहित्यिकापेक्षां महाराष्ट्रांत जास्त प्रसिद्ध असलेले श्री दिवाकर कृष्ण केळकर यांची ग्रंथरचना विपुल नसली तरी विविध आहे यांत शंका नाहीं. "किशोरीचें हृदय" ही कादंबरी, 'समाधि व इतर सहा लघुकथा' हा लघुकथा संग्रह व "तोडही माळ" हें नाटक अशीं तीनच पुस्तकें त्यांनीं अद्यापपर्यंत लिहिलीं आहेत. परंतु या तीन्हीं पुस्तकांनी आपापल्या क्षेत्रांत बरीच वरच्या दर्जाची मान्यता मिळविली आहे. त्यांचा लघुकथा संग्रह इ. स १९२७ मध्यें प्रसिद्ध झाला. म्हणजे आज त्या गोष्टीस तेरा वर्षें झालीं व या तेरा वर्षांत इतके लघुकथा संग्रह प्रसिद्ध झाले आहेत कीं मराठी वाङ्मयांत या कालाला लघुकथा युग म्हणूनच संबोधावें लागेल. पण इतक्या लघुकथा संग्रहामधूनही अति उत्तम म्हणून जीं कांहीं हाताच्या बोटांवर मोजतां येण्यासारखीं पुस्तकें आहेत त्यांत दिवाकर कृष्णांच्या लघुकथासंग्रहाची गणना होते. या पुस्तकांत एकंदरींत सात लघुकथा आहेत. (१) अंगणांतला पोपट (२) हातघाट (३) संकष्टचतुर्थी (४) देवाच्या घरीं (५) मृणालिनीचें लावण्य (६)

वेड्याची कहाणी व (७) समाधि या त्या सात लघुकथा होत. अंगणांतला पोपट या गोष्टींत एका श्रीमंत पण उद्योगाच्या पायीं घरगुती भावनांना पारख्या झालेल्या व्यापाऱ्याच्या मुलाची हकीकत लिहिली आहे. शेट नानूभाईचा लहान मुलगा पोपटलाल हा लहानपणींच मातृसुखाला पारखा झालेला असतो. आपलें कौतुक आपल्या वडीलांनीं करावें ही त्याची इच्छा असते. लाकडाचा हिरवा पोपट घेऊन तो उभा असतो व आपलें वडील आफिसांतून कधीं येतील व आपण त्यांना तो पोपट कधी दाखवूं असें त्याला होतें; पण शेट नानूभाई त्याकडे लक्ष पुरवीत नाहीत त्याला वाटलें वडील आपल्यावर रागावले आहेत. पुढें त्याला ताप भरला. त्याला वाईट वाटूं लागले. त्याला वाटलें सर्व आपलयावर रागावले आहेत. आपलें कौतुक कोणी करीत नाहीं. पुढें त्याला माथेरानला नेण्यांत आलें. नानूभाईनी तेथें ही जाण्यांत दिरंगाई केली ते जाऊन पोहोंचेपर्यंत पोपट बेशुद्ध झाला होता व "सगळे लोक माझ्यावर रागावले आहेत" हा त्याचा एक सारखा जप चालूं होता. पुढें लवकरच तो मेला व त्याचवेळीं घरांतील पिंजऱ्यातील पोपट पण उडून गेला. दुसरी लघूकथा 'हातरहाट' ही एका तरुण कोष्ट्याची जीवन कहाणी आहे. आपल्या खेडेगांवाला व लहानपणीची सोबतीण मंजुळा इला सोडून भिवा सोलापुरास जातो. पण त्याची स्थिति सुधारत नाहीं. इकडे मंजूळेचें लग्न होतें. भिवा सोलापुराहून परत येऊन आपल्या गांवांतच हालअपेष्टेत दिवस कंठून शेवटीं मरतो. तिसरी लघुकथा "संकष्ट चतुर्थी" ही शेजारच्या सासुरवाशिणीच्या छळाची हकीकत आहे. सासू स्वभावानें वाईट नव्हती पण 'तिच्या सासूनें लहानपणीं तिला फार छळलें होतें. त्यामुळे ती दुसऱ्याची पर्वा फारच कमी करी. दुसऱ्याचें बरें पाहून तिला बरें वाटत नसे. अशा सासूच्या नियंत्रणाखालीं सून शांता ही नांदू लागली तिला वाटे शिकण्याकरितां पुण्यास राहिलेल्या नवऱ्याकडून पत्रें यावीत व जोडप्यानें गौर पुजावी पण सासू नवऱ्याचीं पत्रें दाबून ठेवी. व नवरा तिच्याकडे दुर्लक्ष करू लागला. दिवसभर ती कामाखालीं दबून जाई घरात सहानुभूतीचा ओलावा नाही. घरीं प्रीति मिळेना पण शेजारी

तिच्याशीं सहानुभूती दाखविणारा मित्र भेटला. त्यांत शांतेचा स्वभाव हळवा होता ' कोणचीहि गोष्ट तिच्या मनाला चटकन लागे तिला स्वतःला थट्टा करतांच येत नसे. दुसऱ्यांनी थोडी जास्त थट्टा केली, कीं तिला लगेच रडू येई ' अशा हळव्या जिवाला सासू छळी, तिला वाईट पाय गुणाची म्हणे. अशा या भोळ्या व हळव्या जिवानें मन आर्द्र न होणें शक्य नाहीं. तिला माहेरी फार जायला मिळत नसे. पुढें ती झुरणीस लागली, शेवटीं आजारी पडली व जगांतून निघून गेली. चवथी लघुकथा ' देवाच्या घरीं ' आहे. यांत इंदूची बहीण शशिकला इच्या लीला वर्णिल्या असून त्यांत शेवटीं ती आजारी पडून देवा घरी जाते याचें मनाला चटका लागण्यासारखे वर्णन आहे. ' मृणालिनीचें लावण्य ' व ' समाधि ' या लघुकथा सर्वांहून सरस म्हणतां येतील. संस्थानिकाच्या घरांत पडलेली गरीब घराण्यांतील बालिका त्या नवीन परिस्थितीला विटते. तिला आपल्या पति हृदयाशीं समरस होता येत नाही. मुलालाही जवळ घ्यावेसें तिला वाटत नाही व शेवटीं ती झुरून झुरून मरून जाते. अशी हकीकत ' समाधि ' या कथेंत दिली आहे. मृणालिनीचें लावण्यच तिला शापदायक ठरलें व त्यामुळें तिच्यावर सासऱ्याची बद नजर पडली, तिच्या नवऱ्याची तिच्यावर तेवढ्या पुरतीच प्रीति जडली, अशोकच्या जीवनाचा विचका त्यामुळेंच झाला असें दाखविलें आहे.

दिवाकर कृष्णांच्या लघुकथांविषयीं श्री. बा. रा. भाटे म्हणतात " वस्तु वर्णनपर, स्वभाव वर्णनपर आणि वस्तु स्वभाव वर्णनपर या तीन लघुकथा प्रकारांपैकीं शेवटल्या दोन प्रकाराची योग्यता साहित्यकार जास्त समजतात. रा. दिवाकर कृष्ण यांच्या कथा स्वभावरेखनपर असतात. "

दिवाकर कृष्णांना वर्णनाची शक्ति फार मोठ्या प्रमाणांत प्राप्त आहे यांत शंका नाहीं. त्यांच्यांत काव्यात्मकता आहे लहान प्रसंगांचे परिणाम त्यांच्या मनावर तीव्रतेनें होत असले पाहिजेत व वर्ण्य प्रसंग जसे त्यांच्या मनावर परिणाम करितात तसेच ते लेखणींत उतरवूं शकतात. आयुष्यात जें हृदयद्रावक आहे, जें मनाला जाऊन भिडते, जें अंतस्थ विचाराशी संलग्न

आहे अशाला ते खुबीनें बाहेर काढून वाचकांसमोर मांडतात व विषय परिणामकारक, लेखक काव्यात्म व लेखनशैली मनोहर व कसलेली यामुळें लेखकाला जें स्वतःला वाटतें तेंच तो वाचकांना बरोबर वाटावयास लावतो. कोणत्याहि सामाजिक तत्वाचा पुरस्कार दिवाकर कृष्णांनीं आपल्या लघुकथांतून केला नाहीं. नाहीं म्हणावयाला हातरहाट या लघुकथेंत त्यांनीं जातां जाता कारखान्याचे दुष्परिणाम व हातरहाटाचें महत्व दाखविण्याचा अयशस्वी प्रयत्न केला आहे. त्या लघुकथेतील नायक मजुळेला म्हणतो. " तुला मुलगा झाला म्हणजे हा रहाट त्याला दे, आणि माझे अनुभवाचें सांगणें सांग, म्हणावें, सध्यां हातरहाटांत जें सुख आहे तें शहरांतल्या गिरण्यांतून नाहीं. मजुळे, पिढिजाद हातमाग विकले नसते तर तूं परवयाची झाली असतीस कां ? " उपदेश योग्य असेल पण दोन प्रणयी जीवनाच्या अंतिम मीलनांत हा घरगुती धंद्यांचा पुरस्कार कांहींसा विसंगत वाटतो. तंत्र दृष्टीनें पाहातां दिवाकर कृष्णांच्या लघुकथा निर्दोष ठरतात. आटपशीरपणा, परिणामकारक प्रसंग व प्रमाणशीर मांडणी दिवाकर कृष्णांच्या लघुकथांचीं वैशिष्ठये होत. आणखी एक गोष्ट ठळकपणें नजरेंत भरते ती ही कीं त्यांच्या लघुकथांचे बहुतेक शेवट दुःखदायक झाले आहेत. प्रत्येक गोष्टींचा शेवट नायक किंवा नायिकेच्या मृत्यूंत झाला आहे. नाही म्हणण्यास ' वेड्याची कहाणी ' या गोष्टींतील नायक वेडा बनतो. म्हणजे त्यांची स्थितीहि जीवंत असून मेल्या सारखीच होते. मनुष्याच्या आयुष्यांत मृत्युही अशी दुःखदायक घटना आहे कीं कोणत्याही गोष्टींत त्यांचा उल्लेख परिणामकारक झाल्याशिवाय राहत नाहीं. म्हणजे या घटनेचा उल्लेख न करतां परिणामकारक गोष्ट लिहिण्यांत लेखकांचें कौशल्य व्यक्त होतें दिवाकर कृष्णांनीं प्रत्येक खेपेस मृत्यूला आणून वाचकांच्या मनावर परिणाम केला आहे. यांतील कोणतीहि गोष्ट वाचून डोळे आलावणार नाहींत असा वाचक विरळाच. अंगणांतील पोपट, संकष्ट चतुर्थी, समाधि, देवाघरी या लघुकथा हृदयाच्या मर्मस्थानीं आघात करतात. हातरहाट, वेड्याची कहाणी व मृणालिनीचें लावण्य या गोष्टींत थोडीशी Melodramatic ची छटा आहे ती मनाला पटत नाहीं.

अशोकचे भिकारी बनून निघून जाणें आत्मारामाचें वेडा बनणें व भिवाचें मजुळेला न कळत त्याच गांवांत येऊन राहणें व त्याची बातमी तिला न कळणें व शेवटीं तिच्या करितां त्याचें झुरून मरणें इत्यादि गोष्टी मनावर परिणाम करीत नाहींत. दिवाकर कृष्णांच्या नायक नायिका अत्यंत हळुवार मनाच्या व परिस्थितीच्या वणव्यांत दग्ध होणाऱ्या दिसतात. धैर्याचा, धृतीचा, हिमतीचा संदेश दिवाकर कृष्णांच्या लघुकथांतून दिसून येत नाहीं. ते जगांतील घडामोडी आपल्या संवेदना सुलभ मनानें पाहून वाचकांसमोर ठेवतात. संदेश देण्याचा त्यांचा प्रयत्न नाहीं. त्यांच्या गोष्टी हेतु प्रधान दिसत नाहींत. नाहीं तर संकष्ट चतुर्थी, देवाघरीं, मृणालिनीचें लावण्य समाधि इत्यादि गोष्टींतून कोणत्या तत्वाचा त्यांनीं आविष्कार केला आहे? मानवी मन व त्याचे व्यापार यांचाच त्यांनी विचार केला आहे. त्यांच्या नायक-नायिका हळव्या मनाच्या आहेत व भोंवतालच्या परिस्थितीचा परिणाम त्यांच्या मनावर तत्काळ घडतो. या संघर्षातून Tragedy दिवाकर कृष्णांनीं निर्माण केली आहे. बाबासाहेबांसारखा प्रेमळ पति मिळूनही लीला गोरी झुरणीस कां लागावी? माहेरीं राहून सासरीं आल्यावर मुलीला पहिला व शेवटला आधार म्हणजे पतीचा. पण तो चांगला व हौशी मिळाला असून सुद्धां लीला गोरीच्या आयुष्याला बहर कां येऊं नये? तें जाऊं द्या. पण मुलगा झाल्यावर सुद्धां लीला गोरीच्या मुलाविषयीं सुद्धां प्रेम वाटून तिच्या जीवनाला स्थिरता येत नाहीं. याला काय म्हणावें? याला एकच उत्तर कीं, तिचें मन नार्मल नव्हतें. असाधारण मनाच्या या स्त्रीबद्दल तिच्या मृत्यूनेंच सहानुभूति वाटू लागते. खरें पाहिलें तर तिच्यापेक्षां जास्त एकाकी जीवन बाबासाहेबाचें वाटतें व "लिली, लिली, तुझ्या सुखासाठीं मी काय करूं" म्हणून अश्रु ढाळणारा बाबासाहेब जास्त human, अतएव जास्त जवळचा वाटूं लागतो. लीला गोरीच्या दुःखाचें खरें मूळ तिच्या दुःखी मनांत आहे. पण दिवाकर कृष्णांनीं त्याचा दोष परिस्थितीवर घातला आहे ते म्हणतात "कळी कां उमलत नाहीं हें कळी काय सांगणार? तें भोंवतालच्या थंडीला विचारा" लीला म्हणते "मी मन

गुंतून ठेवणाऱ्या जिवंत संसाराला आंचवलें आहे" प्रेमळ नवरा मिळाल्यावर संसाराला आणखी जिवंतपणा तो कोणता हवा? खरें म्हणजे दिवाकर कृष्णांच्या नायक-नायिका स्वत: हळव्या मनाच्या असून परिस्थितीला दोष देतांना आढळतात. गिरणीला बोल लावून झुरून मरणारा भिवा, सौभाग्य धड असतां व सोन्यासारखें मूल असतां झुरून मरणारी लीला गोरी, मोकळ्या मनाचा पति मिळून सुद्धां आपल्या लावण्याला बोल लावून झुरणारी मृणालिनी हीं पात्रें निरोगी वृत्तीचीं असें कोण म्हणेल? या लघुकथा मनावर परिणाम करणाऱ्या असल्या तरी मनाला पटत नाहींत. या लघुकथांतून अनैसर्गिक अशी आर्द्रता दिसून येते. अंगणांतील पोपट व संकष्ट चतुर्थी या दोन गोष्टी मात्र जिवंत वाटतात. यांत पात्रांच्या मनोव्यापारांपेक्षां परिस्थितीचाच परिणाम वास्तविकपणें झालेला दिसून येतो. यांतील कळ्या खरोखरीच भोंवतालच्या थंडीनें सुकून गेल्या आहेत. बाकीच्या पांच लघुकथा हळव्या वाटतात. यावरून लेखकाच्या वृत्तीची मात्र कल्पना करतां येते. लेखक काव्यात्म असावा, हळुवार मनांचा असावा, आयुष्यांतील दु:खद प्रसंगाचीं आठवण वारंवार करण्याकडे त्याची नेहमीं प्रवृत्ति होत असावी, जगांतील संकटाच्या काल्पनिक वा वास्तविक आघातांनीं तो जर्जर झाला असावा व त्यामुळें त्याचें मन मृदु व हळवें झालें असावें. त्यामुळें अशा दु:खमय घटनांकडे त्याचें लक्ष तीव्रतेनें वेधलें जात असावें असें वाटल्याशिवाय राहात नाहीं. पण या लघुकथा इतक्या लोकप्रिय कशा? त्याला कारण एकच आणि ते म्हणजे मानवी मनाच्या एका विशिष्ट पैलूला या गोष्टी बेफामपणें अपील करतात, व दिवाकर कृष्णांनीं हें ओळखूनच आपली पूर्ण प्रतिभा यांत खर्ची घातली आहे. त्या मानानें पाहातां त्यांची "किशोरीचें हृदय" ही कादंबरी जास्त यशस्वी झाली असें म्हणतां येईल.

कारण, मोठ्या प्रमाणावर व गुंतागुंतीचें कथानक घेऊन व तें परिणामकारक करून, हळुवार व दु:खद प्रसंगावर भर देऊन, प्रत्येक कथेच्या शेवटीं मृत्यूला आमंत्रण देऊन व लहानशाच लघुकथा लिहून दमछाटी होणारे लेखक या आरोपांतून दिवाकर कृष्ण वाचले आहेत. पण दिवाकर कृष्णांचा

आवडीचा विषय म्हटला म्हणजे मनोव्यापार हाच. याचें प्रत्यंतर या कादंबरींतून दिसून येतें. तसेंच हे मनोव्यापार निरीक्षणारा व निरीक्षून वाचकांपुढे ठेवणारा कलावंत हीच भूमिका दिवाकर कृष्णांची आहे. कारण या कादंबरीत ही त्यांनीं कोणतांच संदेश देण्याचा प्रयत्न केला नाहीं. हिंदु मुस्लिम प्रश्नाचा उहापोह या कादंबरींतून करण्याचा आपला हेतु आहे असें त्यांनी कादंबरीच्या जाहिरातींत लिहिलें होतें पण तें साधलें नाहीं किंवा त्याची त्यांना आवश्यकता वाटली नाहीं किंवा या प्रश्नाच्या विवेचनानें मूळ विषयांत म्हणजे किशोरीच्या हृदयाच्या आविष्करणात रसहानि होते असें त्यांना वाटलें म्हणून त्यांनीं तो प्रश्न शहाणपणानें बाजूस सारला व आपण कलावंत प्रथम आणि नंतर संदेश देणारे प्रेषित हें त्यांनीं पुन्हां एकवार सिद्ध केलें. या मुळें त्यांच्या कादंबरीला सुटसुटीतपणा आला व त्यांना किशोरी-हृदय मनमोकळेपणानें हेरतां आलें. माझ्या मतें त्यांची ही कादंबरी मानस शास्त्रीय दृष्टीनें बरीच वरच्या दर्जाची ठरेल. एका किशोरीच्या मनाला आपल्या संशोधनाचा विषय ठरवून लहान सहान गोष्टींनींहि तिच्या मनावर काय परिणाम झाला व शेवटीं तिचें रूपांतर प्रौढ तरुणींत कसें झालें हें त्यांनीं फार समर्पक रीतीनें दाखविलें आहे. या दर्जाची व या विषयावरील हीच एक कादंबरी असें म्हटल्यास वावगे होणार नाहीं. "खऱ्या प्रेमाचा उद्भव ही एक फार मोठी प्रायोगिक प्रक्रिया आहे. विश्वास आणि चैतन्य असे दोन जिवलग स्नेही किशोरीवर प्रेम करतात पण अभिलाषा दूषित विश्वासरावास सोडून किशोरी संयमी चैतन्याचा स्वीकार करते व विश्वासराव देशत्याग करतो" हें कथानक या कादंबरीत आहे व "प्रेमाचे निरनिराळे प्रयोग आणि त्यांचा प्रेम करणाऱ्यावर, प्रेम स्वीकारणाऱ्यावर, व प्रेम पाहणाऱ्या वयस्थावर होणारा परिणाम या कादंबरींत विस्तारशः वर्णिला आहे."

या कादंबरीतील कथानकाला सुरवात जून १९२८ मध्यें होतें व शेवट डिसेंबर १९३० मध्यें होतो. किशोरीला ( कादंबरीची नायिका ) नुकतेंच सतरावें वर्ष लागलेलें असतें. तिची आई तिला सोलापुराहून पुण्यास

हुजूरपागेंत सातवींत घालण्याकरितां घेऊन येते. गाडींत किशोरी, तिची आई यांची कथानायक चैतन्यकृष्ण पंडित, विश्वास, व जयंती याच्याशीं ओळख होते. चैतन्य हा तिशीच्या आंत बाहेरील तरुण होता. तो समाजशास्त्राचा अभ्यासक, मजुराचा पुढारी, व तत्वज्ञानी होता. १९२१ च्या चळवळींत त्यानें कॉलेजचा अभ्यासक्रम सोडून दिला. त्याची कल्पना "आपल्या समाजाची सर्वांगीण पुनर्घटना झाली पाहिजे. स्वातंत्र्य या एकाच साध्यासाठीं आपले सर्व रूळलेले मार्ग सोडून आपण चहूंकडून चढाई केली पाहिजे. आपल्याला काय पाहिजे याची कल्पना निश्चित करून त्याच्या आड येणाऱ्या सर्व संस्थांचा विनाश करायला तयार झाले पाहिजे".. पण प्रवासांत, 'स्वातंत्र्य रतीच्या विषयांत सर्व जनता अगदीं नववधू आहे असा आपला सिद्धांत झाला. क्रांतीची निराशा आणि उत्क्रांती वरील अविश्वास तीन्हींही निश्चित झालीं' चैतन्याच्या मतें "समाजानें धर्मांचें प्रस्थ उगीच माजवून त्याला डोईजड करून ठेविलें आहे. वाजवी पेक्षां फाजिल महत्व दिल्यामुळें त्यानें आपल्या इतर शक्ति बोथट केल्या आहेत. धार्मिकताच पुष्कळदां बेजबाबदारपणा उत्पन्न करते तिच्या भुलींत लोक पडले आहेत धर्म ही फक्त अभिमान बाळगण्याची गोष्ट आहे. करमणूक म्हणून असावी . ... पण मी कांहीं लोकांना उपदेश करायला आलेला प्रेषित नाहीं. मी या अफाट चमत्कारिक देशाचा एक अभ्यासक आहे."

म्हणजे चैतन्याची भूमिका तत्वज्ञाची आहे. तो ज्ञानयोगी दिसतो. अशा या तत्वज्ञान्याचा संबध दोन तरुणींशीं आला. पैकीं एक, जयंती, ही प्रौढ तरुणी होती. व दुसरीं किशोरी सतरा वर्षाची होती. जयंती ही नगर च्या मिशनमध्यें वाढलेली पण परदेशांतील शिक्षणानें सुसंस्कृत बनलेली ('१९२१ च्या चळवळीत) या सुमारास ती प्यारिसमध्यें होती म्हणजे १९२८ त ती पचवीस तिशीच्या आंत होती अशा या सुसंस्कृत तरुणीबद्दल चैतन्याला काय वाटलें ? तर 'जयंती एक अलौकिक स्त्रीरत्न आहे' एवढेच, पण किशोरी एक अतिशय गोड अशी पोरगी आहे—आणि या तिशीच्या घरांत पोंचलेल्या तत्वज्ञान्याला किशोरीनें कोणत्या जोरावर भारून

टाकलें ? शिक्षणाच्या जोरावर ? नाहीं; कां व्यक्तित्वाच्या जोरावर ? नाही; कां पुढे पुढे करण्यावर ? नाही. तर " केवड्याच्या पानासारखा असा तिचा वर्ण दगदगीनें दवडवल्यामुळें अधिकच शोभिवत दिसत होता. केसांतील बकुळीचीं फुलें आपल्या दरवळानें तें सुगंधाचें ठिकाण आहे असें सुचवीत होती निशिगंधाच्या फुलाप्रमाणें दिसणाऱ्या कानांत दवा प्रमाणें फुली चमकत होती. टॉर्च लाइटला दिपणाऱ्या पांखरा प्रमाणें तिची ती लाजरी नजर--" ( पान ३ ) प्रो. फडक्यांना हेवा वाटावा असें वर्णन सुंदर साधलें आहे पण निवळ सतरा वर्षाच्या किशोरीवर रूपामुळेंच लुब्ध होणाऱ्या या तिशीच्या तत्वज्ञाविषयीं विशेष अनुकूल ग्रह होत नाहीं. जेव्हां जेव्हां किशोरीविषयीं त्यांच्या मनांत विचार येत तेव्हां तेव्हां तिच्या रूपासंबधानें असत. " केवड्याच्या पानासारखा तिचा वर्ण, काळे भोर डोळे, स्वभावतःच फुगीर केस, निरागस दृष्टि, लहान जिवणी, गालावरील खळी, लाजत बोलणें, वळून वळून पाहणें सर्व कांहीं अगदीं ताजेसें वाटू लागलें. "--" आणि जयंती-संकोच नाहीं, दुजा भाव नाहीं. स्नेहाचा अतिरेक नाहीं, मर्यादा भंग नाहीं, एखाद्या कसलेल्या चित्रकारा- प्रमाणें न चुकतां आपल्या विविध गुणांच्या छटा त्याच्या हृदयांतील प्रति- कृतीवर उठवीत होती. " (३४) म्हणजे चैतन्य हा तत्वज्ञानी, अभ्यासू वृत्तीचा, ( पण रॉयल एशियाटिक सोसायटींतील ग्रंथांचा अभ्यास करून कटाळलेला ), अल्लड किशोरीच्या रूपावर भुलणारा व सुसंस्कृत, सुशिक्षित, अशा जयंतीपासून दूर होणारा आहे. बरे हा मोठा ध्येयवादी म्हणावा तर याच्या समोर निश्चित ध्येय असें कोणतेंच नाहीं. याचा उत्क्रांतीवर ही विश्वास नाहीं व क्रांतीही याला शक्य वाटत नाहीं " स्वतः आपलें ध्येय ठरवावें, त्यासाठीं झटावें, त्यांतील यशानें सुखी व्हावें, अयशानें दुःखी व्हावें यांतच खरा जिवंतपणा आहे " असें तो म्हणतो पण त्याचें स्वतःचें कोणतेंच ध्येय नाहीं. कादंबरी सुरू झाल्यापासून त्याच्या हालचाली पहा.

( १ ) १९२१ च्या चळवळींत त्यानें अभ्यास सोडला. नंतर त्यानें समाजशास्त्राचा अभ्यास केला व लोकनिरीक्षणार्थ त्यानें प्रवास केला.

त्याचीं व्याख्यानें नगर व सोलापूर येथें झालीं. सोलापुरांस किशोरी त्याचीं व्याख्यानें भक्तिभावानें ऐकत असे. नगरला त्याची व जयंतीची ओळख होऊन तो तिच्या बरोबर मुंबईस आला. मधगें दौंड तें पुणें, त्याची व किशोरीची ओळख झाली व तिनें त्याला भारून टाकलें. ही हकीकत सन १९२८ च्या सुमाराची.

( २ ) मुंबईस त्याचा काळ जयंती मीनाक्षीं, लहानपणापासूनचा सोबती श्रीमंत विश्वास यांजमध्यें जातो रायल एशियाटिक सोसायटीत पुस्तकें वाचण्यांत व विचारातिरेकानें जाग्रणें करण्यांत तो वेळ घालवितो. तेथून तो नि विश्वास पुण्यास जातात त्याचीं दोन तीन वाक्यें, आनंदराव, किशोरीचा मावस भाऊ म्हणून दाखवितात, ती अशी " शिकलेल्या मुली जसं घोगडींत निखारा न पाहतांच अधण ठेवावें तसं वाटेल त्याच्या खांद्यावर मान ठेवतात " व " मोठ्या डोळ्याच्या मुली बहुतेक थिल्लर असतात. "

( ३ ) पुण्यास चैतन्य तिला भेटण्यास जातो पण तिची गांठ पडत नाहीं. विश्वासचें ही मन किशोरीकडे आकर्षिलें जातें व ते दोघेही एकमेकांशीं लपवालपवी करतात. शांतवनाची प्रिया ईरावती आहे हें शांतवनच्या स्त्रीला–पद्मेला कळून तिला दुःख होतें त्याबद्दल ईरावतीशीं बोलण्याच्या निमित्तानें चैतन्य किशोरीची गांठ घेतो. " सिनेमाला येऊन ओळखही न देणाऱ्या मुलीला दोनदा भेटायला आल्याचा कमीपणा येऊं नये अशा मानी विचारानें " तिला पूर्वी भेटायला आल्याचें तो सपशेल नाकबूल करतो.

( ४ ) त्याच दिवशीं त्याच्या नांवचें लेबर युनियनच्या सेक्रेटरीचें ( कुठले युनियन कळत नाहीं ) सोलापूरला जाऊन प्रचार कार्य करण्याबद्दलचें पत्र येतें. पुढें तो सोलापुरास निघून जातो. सोलापुरांतील त्याच्या कार्याविषयीचें त्याचें पत्र पाहा.

" मला कामांत आनंद वाटतो पण दुसऱ्या कशांतच वाटत नाहीं असें कसें म्हणतां. त्या कामाची कदर करणारीं गोड आणि प्रेमळ हृदयें मला

त्याहून अधिक आनंद देतात..... लेबर युनियनच्या सेक्रेटरीनीं आपल्या जवळ मी येथील अशिक्षीत मजुरांची जी अगदीं थोडया काळांत नमुनेदार संघटना करू शकलों आहे त्याबद्दल अतिशय स्तुति केल्याचें लिहिलें तें सगळें उपरोधिक असावें..... गेल्या सुट्टींत किशोरीचें संस्कृत कच्चें होतें म्हणून मी शिकविलें ( पान ८४ )

( ५ ) पुढें मॅट्रिक पास होऊन किशोरी कॉलेजांत जाते. चैतन्य पुन्हां पुण्यास येतो. किशोरी आईच्या सांगण्यावरून त्यास भेटण्यास जाते. पण तो केडगांवास निघून जातो तेथून तो सोलापुरास परभारें निघून जातो. त्याचें आणखी एक वाक्य आनंदरावनीं सांगितलें " तरुण स्त्रियांच्या मनांत नेहमीं कांहींतरी पेक्षां कुणीतरीच जास्त घोळत असतें " (पान १२७)

( ६ ) त्याची पुढील कामगिरी ( पान १६१ ) कांहीं शहाणें सुर्ते लोक गरीबांना बहकावून संप वगैरे करवतात. असाच एक कुणी पंडित म्हणून मनुष्य इथें आला आहे सगळे जबाबदार लोक त्याच्या नादी लागले आहेत. त्याच्या सांगण्यावरून टांगे हाकणारे संप करणार आहेत. तसेंच ( पान १६१ ) नव्या गिरणींत मालक मजुरांमध्यें रजा मंजूरीबद्दल तेढ आली आहे. योग्य समजूत करून ती तेढ मिटविली नाहीं तर संप होण्याची भीति आहे. संप होणें या वेळेला बरें नाहीं. कंपनी जवळ स्टॉक भरपूर आहे. पण मजुरांना हें पटत नाहीं.. मी मालकांच्याकडे मध्यस्थी केली असून त्यांनी वरून दिसायला सर्व अटी मान्य कराव्या आणि वस्तुत: मजुरांना फसवावें असें ठरवून आलो." " ( पान १६४ ) प्रसंग असा आहे. एथिक्स कसेंही असो "..... कांहींतरी करायला पाहिजे ना ? मुळींच कांहीं न करण्यापेक्षां चुकीच्या दिशेनें प्रयत्न करणें तरी चांगलें नाहीं कां ? " " कर्तव्य म्हणून केलेल्या कार्यांत अर्थातच कांहीं हौस मौज राहिली नाहीं. कांहींतरी नवीन दिशा आणि कार्यक्षेत्र स्वीकारलें पाहिजे असें त्याच्या मनांत येऊ लागलें. हिंदुस्थानांत एक युजेनिक्स सोसायटी स्थापन करावी. इतर देशांतील मोठमोठ्या कार्य प्रयोगशाळांप्रमाणें त्याची कार्यक्षमता वाढवावी

असें विचार चैतन्य बोलून दाखवूं लागला ..भांडवलवाल्यांचा त्याला इतका द्वेष येत नसे आमच्या अधोगतीला भांडवलवाल्यापेक्षां सरकारचें धोरणच जास्त कारण आहे असें त्याचें निश्चीत मत होतें.

अशा या चैतन्याच्या मनांत, जयंत जर हवा पालट करण्याकरितां जाणाऱ्या मीनाक्षी बरोबर सोबत म्हणून गेली नसती तर, कदाचित जयंतीशीं लग्न करण्याचा विचार आला असता; पण याच वेळेस त्याचा पुन्हां किशोरीशी संबंध आला. पुढें किशोरीचें विश्वास बरोबर लग्न ठरलें. चैतन्याला धक्का बसला. त्यानें किशोरीची गांठ घेतली. त्यादरून तिच्या मनाविरुद्ध हें लग्न होतें आहे हें त्याला कळलें अशा हुरहुरींत असतां चैतन्य सोलापूरच्या दंग्यांत सांपडला. पुढे किशोरीची गांठ पडल्यावर तो तिला म्हणतो " मी अशा गोत्यांत सांपडून तुमच्यासाठीं कांही करायला असमर्थ झालो आहे. देवाच्या मनांतच असें आलें "...किशोरी जशी त्याच्याकडे गेली तशीच निराधार परत आली. पुढें लग्न टाळण्याकरितां किशोरी मुंबईस जाते व आरोपांतून सुटून चैतन्य ही मुंबईस येतो नंतर त्या दोघांचें लग्न होऊन प्रेमभग्न झालेला विश्वास जावा बेटांत निघून जातो.

दिवाकर कृष्णांनीं चैतन्याचें पात्र कसें रंगविलें आहे ? निश्चित ध्येय नसणारा, कर्तव्य म्हणून कांहीं तरी करावें अशा उदासीन वृत्तीनें काम करणारा, अभ्यास वृत्तीचा, समाजशास्त्रांत डोकें घालून बसणारा, संयमी चैतन्य दिवाकरांनीं वाचकांसमोर उभा केला. चैतन्य आपल्याला या अफाट चमत्कारिक देशाचा अभ्यासक म्हणवितो व संप्रदाय कोणता म्हणून विचारलें तर बृहदारण्यकांतील प्रवाशासारखी आपली स्थिति झाल्याचें सांगतो, हरिभाऊ आपल्यांचे गणपतराव व यशवंतराव हे समाजसेवेची तळमळ बाळगणारे ध्येयवादी आहेत. वा. म. जोशांचा 'आनंदराव' हा संशोधक म्हणून प्रसिद्धी मिळवणाऱ्या नांवांत लागलेला व या रीतीनें देशाची कीर्ति वाढवावी म्हणणारा महत्वाकांक्षी तरुण आहे. खांडेकरांचे नायक अलीकडे साम्यवादी बनूं लागले आहेत पण या विशाल प्रश्नाला

निवळ उंदरासारखे कुरतडण्या पलीकडे तो कांहींच करीत नाहीं. कोकणांतील खेड्याची परिस्थिती पहा, घरण्याकरितां सरकार जमीनी मागत असतां त्या देऊं नये म्हणून चळवळी करणें अशा धंद्यांत त्यांचे नायक पडतात. फडक्यांचे नायक उघड उघड सुखवस्तु आहेत. वरेरकरांचे नायक प्रवाह-पतित व मिळमिळीत व नायिका मात्र त्या मानानें जोरदार आहेत. तळवळकरांचा प्रकाश, गोगट्यांचा विनायक हे फिकट रंगाचे साम्यवादी आहेत पण दिवाकर कृष्णाचा चैतन्य हा विद्वान अभ्यासू पण कोणताही सांप्रदायीक, कोणतेही ध्येय नसलेला बृहदारण्यकांतील प्रवासी आहे. आपले हे समाज सुधारणेची तळमळ बाळगणारे होते. जोशांना देशाची क्रांति कोणीकडून होईल याबद्दल निदिध्यास आहे. वरेरकरांचें स्त्री दाक्षिण्य व स्त्रियांच्या हक्का बद्दलचा झगडा ही तर इतकीं प्रसिद्ध आहेत कीं त्याचे व्यंगचित्र काढतांना त्यांना स्त्रीरूप देऊन वेणी बुचडा घालण्यापर्यंत चित्रकारांनीं मजल नेली. खांडेकर हे स्वतः फिक्कट साम्यवादी आहेत. फडके तर उघडउघड सुखवस्तु कलावंत आहेत आणि माझ्या मतें दिवाकर कृष्ण हेच स्वतः बृहदारण्यकांतील प्रवासी आहेत. ते एक कलावंत, अभ्यासक व निरीक्षक आहेत. त्यांचा स्वतःचा सांप्रदाय असा कोणताच नाहीं. माझ्या मतें दिवाकर कृष्णांचा चैतन्य हा त्यांचा आवडता नायक व त्यांचें मनाचें पात्र आहे व लग्नानतर हा चैतन्य जेव्हां म्हणतो.

" पण माझी सगळीं ध्येये स्वाहा झाली बरें कां." तेव्हां हंसू आल्याशिवाय राहात नाहीं. या तत्वज्ञाचें शेवटचें ध्येय युजेनिक्सचें स्कूल स्थापन करण्यावर येऊन ठेपलें होतें. लग्नानंतर चैतन्याच्या उद्गारावर किशोरी म्हणते " हो! आपण नवीन कल्पू म्हणे " इतका त्याचा आव या पोरीनें ओळखला होता. एकंदरीत चैतन्याचें पात्र मोठें गंमतीदार आहे.

अशा या चैतन्यावर किशोरीचे प्रेम कां बसलें ? माझ्या मते त्याला दोनच कारणें आहेत. एक म्हणजे तिच्या ओळखीचे असे दोनच कुमार तिच्या नजरे समोर वावरत होते. एक चैतन्य व दुसरा विश्वास. म्हणजे लग्ना बद्द-

लची तिची निवडच मुळी मर्यादित झाली होती या दोन्हीं पैकीं तिला आधी विश्वास बद्दल अनुकूल ग्रह उत्पन्न झाला होता. पण त्याचा व हिरा पाटसकरचा संबध पाहून तिच्या मनाला धक्का बसला. नंतर पद्मावतीवर विश्वासचे प्रेम असून त्याची पुढची वागणूक पाहून तिला भीति वाटूं लागली व अभिलाषायुक्त प्रेम करणारा हा विश्वास लग्नाच्या बेडीत अडकून राहूं शकेल कीं नाहीं याबद्दल तिला शंका येऊं लागली. त्याच्या उलट. जो जो विश्वासला टाकण्याचा ती प्रयत्न करी तों तों तो तिला येऊन बिलगण्याचा प्रयत्न करी. त्या उलट चैतन्याशीं भेटावें बोलावें असें तिला जेव्हां जेव्हां वाटे, तेव्हां तो तिला भेटत नसे. त्याच्या प्रेमांत जबरदस्ती, प्रखरपणा, अभिलाषा, गुदमरून टाकणारे व अस्वस्थ करणारी धिसाडघई तिला दिसली नाहीं. म्हणून तिचें लक्ष आपोआप त्याकडे आकर्षिलें गेलें. कोणत्याही तरुणी समोर ही दोन पात्रें उभी केल्यास ती भावनावश स्वच्छंदी व विषयी विश्वासला सोडून संयमी चैतन्याला वरल्याशिवाय राहणार नाहीं. आणि किशोरीनें हेंच केलें. या एका गोष्टी शिवाय चैतन्यापाशी कोणतेच भुलावणीपत्र नव्हतें. ना ध्येय, ना कोणतेही कार्य करण्याची हिरीरी, ना चिकाटी; कांहीं नाहीं. पण अभिलाषा युक्त विश्वासच्या प्रेमाच्या पार्श्वभूमी संयमी चैतन्याचें प्रेम तिच्या नजरेंत भरलें हेंच खरें. किशोरीच्या हृदयांत प्रत्यही उत्पन्न होणाऱ्या गूढ भावनांचें चित्रण मात्र दिवाकर कृष्णांनीं फार सुंदर केलें आहे. सोलापुराहून पुण्यास नव्यानेंच येणारी अल्लड कुमारी, ईरावती बरोबर तिची मैत्री जडल्याबरोबर अस्फुट कळीप्रमाणें हळूं हळूं बदलूं लागते. कबूतरांचें प्रणय पाहून तिच्या मनांत भावना येऊं लागतात. मावस भावाचा व भावजयींचा प्रणय व्यापार पाहून तिचें अंग रोमांचित होते व आरशांत स्वत:कडे पाहून ती आपलेंच चुंबन घेतें. ईरावती व शांतवनाचा व्यवहार पाहून " स्वत:ला अज्ञात असलेल्या केवळ कल्पनारम्य असलेल्या त्या आत्यंतिक सुखाची साश, सासूय आणि सापुलक विचारणा स्वत:च्या मनाशीं करीत किशोरीनें प्रॅक्टिकल केलें. " विश्वासराव व हिरीचा प्रेमप्रसंग पाहून तिला न कळत मत्सर वाटला ( पान ८८ ). हिरी, सुसी कुक, ईरावती देशपांडे, पद्मावती

भावे, वत्सला चिटणीस, नलिनी नगरकर, मदालसा, इंदु ठकार, इत्यादि पात्रें दुय्यम असली तरी प्रत्येकाच्या वागणुकीचा परिणाम किशोरीच्या हृदयावर कसा होत गेला व त्यामुळें तिचें हृदय हळु हळू कसें पुलकित होत गेलें हें अति गोड गोडपणें दिवाकर कृष्णांनी दाखविले आहे. नाहीं तरी दिवाकर कृष्णांना पुरुष पात्रापेक्षां स्त्री पात्रेच चांगली निर्माण करतां येतात. मृणालिनी, संकष्ट चतुर्थीतील शांता, समाधीतील हळुवार मनाची लीला गोरी, किशोरी, पद्मा, ईरावती, जयंती इत्यादि पात्रें मनाला केवढा चटका लावतात " अभिविघ्नुत् प्रमदानां त्वमपिच दुःखं न जानासि " असें म्हणणाऱ्या नायिकेच्या मनांतील दुःखे दिवाकर कृष्ण अचुक ओळखतात. कोणत्याही संप्रदायाचें शिष्यत्व न पत्करलेला हा बृहदारण्यकांतील प्रवासी महिला मनोविश्लेषण करण्यांत मोठा पारगत असतो, याचें प्रत्यतर हे कीं माझ्या मतें दिवाकर कृष्णांची जयंती ही एक अमरकृति आहे. जयंतीच्या पात्रापुढें त्यांची इतर पात्रें माझ्यामतें फिक्की पडतात. ब्राम्हण कुलोद्भव पण लहानपणापासून ख्रिस्ती मिशनरी वातावरणांत वाढलेली जयंती उच्च शिक्षणानें सुसंस्कृत, सभ्य व संयमी बनलेली असते. तिच्या सुरूपतेवर फिदा होऊन भोंवतीं गोंडा घोळणाऱ्या तरुणांना झिडकारण्याइतकें नीतिधैर्य तिला असतें. पण निरभिलाष व निरपेक्ष अशा चैतन्याकडे पाहून तिला हुरहुर वाटूं लागते. व पंचवीस वर्षे वयापर्यंत प्रेमाचा अनुभव न घेतलेल्या जयंतीच्या हृदयांत अनंग प्रवेश करतो व चैतन्याबद्दल तिला विलक्षण आपलेपणा वाटतो. समानशील, समानव्यसन व समवयस्क अशा आपल्याला सोडून चैतन्य मॅट्रिकमध्यें शिकणाऱ्या नवतारुण्य व रूपाशिवाय दुसरा कोणताच गुण नसलेल्या किशोरीशी लग्न करील ही कल्पनाच तिला पटत नाहीं आणि ज्यावेळीं चैतन्य तिला सोडून किशोरीला पत्करतो त्यावेळीं तिच्या मनावर जबरदस्त आघात झाला. पण शब्दानें व्यक्त करण्यास अशक्य अशा या तळमळीचें चित्रण दिवाकर कृष्णांनीं थोडक्याच शब्दांत किती प्रतिभेनें केलें आहे पहा.

" जयंती म्हणाली "

"मला फार आशा वाटत होती. शेवटीं शेवटीं तर अगदीं विश्वास वाटूं लागला होता. पण एकदम अभ्रे जमून यावींत तसें झालें..."

"तुझ्या पेक्षां रूपानें गुणानें, बुद्धीनें, विद्येनें कशानें तरी सरस..."

"प्रीती या गोष्टी पाहात नाहीं...."

"जाऊं दे. विसरून जावें सगळें हें चांगलें."

"छे, कसलें विसरतें !"

"मग काय तूं नेहमीं अशीच दुःखी राहणार" ?

"मनुष्याला तसें राहणें शक्य नाही. कांहीं दिवसांनीं मी पूर्वी सारखी हंसेन, खेळेन पण एकदा लागून गेलेला चटका राहणार" !

"समुद्रावर सांवली पसरत होती. बेटावर दिवे लागत होते, भरतीच्या लाटा येत होत्या, वाळूच्या ढिगावर जयंती कांहीं तरी लिहीत होती. सधिप्रकाशानें पाणी चमकत होतें. विविध रंगी वेषांचीं असंख्य जोडपीं जवळून जात येत होतीं. मुलें खेळत होतीं. मचवे हालत होते. मीनाक्षी म्हणाली:–

"एकंदरींत प्रेमांत फार दूरवर पाऊल टाकणें चांगलें नाहीं !"

"तें आपल्या हातचें कां आहे ?"

अंधार पडला तसें मीनाक्षीनें म्हटलें:–

"चल, घरीं जायचें नाहीं कां ?"

"हें बघ, इथंच रहावं असं मला वाटतंय."

या पेक्षां उत्तम वर्णन सांपडणें अशक्य. जयंतीच्या हृदयांत माजलेल्या निराशेच्या तुफान सागराला फक्त एक लहानशा वाक्यबिंदूनें बाहेर येण्यास जागा मिळाली "इथंच रहावं असं मला वाटतंय" पण त्या एका बिंदूंत निराशेचा सागर व्यक्त झाला व या सुसंस्कृत संयमी व विचारशील तरुणीवर कधींच नव्हता इतका जबरदस्त आघात झाला. या तिच्या मूक

क्रंदनापुढे शब्दच निःशब्द आहेत. अशा या जयंताचें पात्र निर्माण करून दिवाकर कृष्ण हे महाराष्ट्रांतील विद्यमान मोजक्या कलावंताच्या गंगेत मानाची जागा मिळवून बसले आहेत.

" दिवाकर कृष्णांच्या उपमा किती समर्पक आहेत पहा. काळ्या केसाच्या झुबक्यामध्यें तिचें गोरें मुख गंगावनावर पडलेल्या फुप्रमाणें दिसत होते. टर्किश टॉवेलच्या आवरणामधून दिसणारे अवयव पारिजातकाच्या राशी मधून डोकावणाऱ्या केवड्याच्या पानासारखे दिसत होते."

( पान १०८ )

" सुखें अशीं आपल्या दारावरनं जातात आणि आपण मात्र माजघरांतच राहतो." ( पान १३५ )

" खिडकींतून येणाऱ्या अत्यल्प संध्रि प्रकाशांत ती जीवितासारखीं अशींच अंधुक दिसणारीं कोडीं सोडवीत पडलीं होतीं." ( पान १८५ )

" एखाद्या मोठ्या करंड्यास झांकण घालावें तशी सध्या पडत चालली होती." ( पान १७६ )

" पंख फुटलेलीं पांखरें देखील घरट्या भोंवतींच घुटमळतात "

( पान २०३ )

हीं कांहीं उदाहरणें झालीं. अशीं वाक्यें या कादंबरीत जागजागी विखुरलेलीं आढळतील. मराठवाड्यांतील या कलावंत लेखकाला अभिवादन असो.



# श्री. विश्वेश्वर अंबादास कानोले

नांदेडचे सुप्रसिद्ध इतिहास संशोधक विश्वेश्वर अंबादास कानोले यांचें लिखाण वर्तमानपत्रांतून ठिकठिकाणीं विखुरलेलें आहे. पण पुस्तक रूपानें फक्त गुरु गोविंदसिंहाचें चरित्र त्यांनीं लिहून प्रसिद्ध केलें आहे. कानोल्यांचा लेखनव्यवसाय आज जवळ जवळ एकोणीस वीस वर्षें अव्याहत चालला आहे. मराठवाड्याच्या संत कवींच्या व पंडित कवींच्या वाङमयांतील त्यांचें संशोधन विद्वज्जनांच्या आदरास पात्र झालें आहे. वामन पंडितांचें घराणें मूळचें नांदेडचें हें त्यांनीं सिद्ध केलें आहे व यावेळीं त्यांच्यापाशीं जवळ जवळ चारशें पानांचें वामन पंडितावरील हस्तलिखित पडलें आहे. अरुणोदय माला, विहंगम, चित्रमय जगत्, निजाम विजय इत्यादि नियतकालिकांतून त्यांचे स्फुट लेख प्रसिद्ध झाले आहेत. कळमनुरीचा कवि प्रल्हाद सोनार, नांदेड जिल्ह्यांतील कवि व संत मंडळी, गुरु गोविंदसिंह, सदानंद महाराज उमरीकर, ज्ञानेश्वर महाराज इत्यादि विविध विषयांवर त्यांनीं लेखणी चालविली आहे. ज्ञानेश्वर दर्शन या पुस्तकांत त्यांचा लेख " श्री ज्ञानेश्वरीच्या उपलब्ध प्रति " हा आला आहे. या लेखात कानोल्यांची संशोधकी

दृष्टि, जिज्ञासा व वाङ्मय सेवेचीं आवड हीं दिसून येतात. मराठवाड्याच्या एका सुपुत्राचा हा लेख म्हणजे महाराष्ट्राच्या वाङ्मयीन चळवळीत मराठवाड्याच्या महत्वाच्या भूमिकेबद्दलची महाराष्ट्राची वाढती जाणीवच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण हे सर्व लेख इतस्ततः विखरलेले आहेत. पुस्तक रूपानें फक्त गोविंदसिंहाचें चरित्र कानोल्यांनीं लिहिलें आहे. त्यामुळें त्यांच्या शैलीचें व विचारांचें वैशिष्ट्य या पुस्तकांतच शोधावें लागेल.

चरित्राच्या पहिल्या पानावर कानोले लिहितात:--

नांदेड येथील अप्रतिम, सुंदर आणि भव्य असें श्री गुरुद्वार मंदिर याचें दृष्टीपुढील चिरसान्निध्य आणि ज्या महान-विभूतीमुळें ह्या स्थळास महत्व प्राप्त झालें आहे. त्या खालसा धर्म-संस्थापक श्रीगुरू गोविंदसिंहा विषयींचा पूज्य भाव, हाच प्रस्तुत चरित्र लिहिण्याच्या स्फुर्तीस अथवा कल्पनेस म्हणा मुख्यतः कारणीभूत झाला आहे " व चरित्रनायका विषयीं आपला आदर त्यांनी पहिल्याच वाक्यांत व्यक्त केला आहे.

गुरु गोविंदसिंहाचा जन्म इ. स. १६६१ मध्यें बिहार प्रांतांतील पाटणा शहरीं झाला. त्यावेळी औरंगजेब बादशाहाच्या कारकीर्दीस नुकतीच सुरवात झाली होती व मोगल साम्राज्याच्या सीमा गुजरातपासून असामपर्यंत व काश्मीर पासून अहमदनगर पर्यंत पसरल्या होत्या. गुरुगोविंदसिंहाचे वडील तेग बहादूर हे त्या वेळीं पाटण्यास नव्हते. आसामच्या मोहिमेवर ते मोगलांच्या बरोबर गेले होतें. पांच वर्षांनीं गुरु गोविंद हा तेजबहादुरकडे राहण्यास म्हणून पंजाबांत आनंदपूर येथें गेला. ( १६६६ ) तेथेंच इ. स. १६७३ मध्ये त्यांचें लग्न वयाच्या बाराव्या वर्षीं झालें.

त्या सुमारास दिल्लीस औरंजेबाची राजवट चालू होती. शिखांच्या वाढत्या महत्वाकडे त्यांचें लक्ष लागलें होतें. पांचव्या गुरूच्या वेळेपासून शिखांचा संबंध राजकारणाशीं येऊं लागला. जहांगीरचा मुलगा खुश्रु यांच्या बंडात खुश्रूस मदत केल्याच्या आरोपा वरून शिखांनां जबर दंड द्यावा लागला होता. त्या वेळेपासूनच मोगल सम्राटाशीं असलेले शिखाचे संबंध

हळूं हळूं बदलू लागले. पुढे गुरु तेज बहादुरच्या वधानें ( १६७४ त ) शिख जातींत नवीन चैतन्य फुकलें गेलें. प्रत्यक्ष पित्याच्या अमानुष वधानें गुरु गोविंदच्या मनाचा किती क्षोभ झाला असेल याची कल्पना केलेली बरी. त्या वेळेपासून मोगल साम्राज्याचा विरोध, आपल्या समाजाची संघटना व त्या निमित्त उपायाची योजना या ध्येयाची उपासना त्यांनीं चालविली. पंजाबच्या पहाडी प्रदेशांत कांग्रा व कुलू भागांत बरींच राज्यें आहेत. तेथे त्यांनीं आपलें वास्तव्य केलें. नाहान राज्यांत पावटा येथें इ. स. १६८४ मध्यें त्यांनीं किल्ला बांधिला नंतर आनंदपूर, चमकोर, केशगड, लोहगड, इत्यादि किल्ले त्यांनीं बांधले इतके झाल्यावर मोगलाशीं लढण्याकरितां म्हणून त्यांनीं या पहाडी राजाच्या मदतीची याचना केली. ती मागणी त्यांनीं धुडकावून लाविली व परस्पर द्वेषाचे पर्यवसान लढाईत झालें. सर्व पहाडी राजांच्या संयुक्त सैन्याचा गुरू गोविंदांनीं इ. स १६८५ मध्यें भिगोईच्या लढाईत पराजय केला व त्यांना हतप्रभ केलें. यावेळीं गुरुगोविंदांचें वय अवघें पंचवीस वर्षांचें होतें. या नंतर या राजे लोकांशीं गुरु गोविंदानीं सख्य केलें.

या नंतर लवकरच पहाडी राजांनीं मोगलांना खंडणी देण्याचें नाकारलें होतें म्हणून मोगलाची फौज त्यांच्या पारिपत्या करितां निघाली होती. पहाडी राजांना गुरूगोविंदानें मदत केली. व इ. स १६८८ मध्यें मोगल सरदार दिलेरखां, रुस्तुमखां व गुलामहमनखां यांच्या फौजेचा पराभव करण्यांत आला. या पराभवाची वार्ता समजतांच अवरंगजेबानें राजपुत्र मुअज्जम बरोबर फौज देऊन या स्वारीवर पाठविलें. या स्वारींत मोगलांना पूर्णपणें यश आलें." या फौजेनें पहाडी राजांस त्राहि त्राहि केलें. त्यांचीं शहरें उध्वस्त केली, राजे लोकांची धिंड काढली आणि त्यांच्या पासून खंडणी गोळा केली. ह्या लढाई नंतर पहाडी राजांनीं मोगला विरुद्ध पुन्हां आपलें डोकें वर काढलें नाहीं. " ( पान ११ ) या आपत्तींतून गुरु गोविंद वाचले व राजपुत्र मुआज्जम यांच्या वाटेस गेला नाहीं. या नंतर सात आठ वर्षेपर्यंत त्यांचा काळ शांततेंत गेला व हा काळ त्यांनीं आपली शक्ति संघटित करण्यांत घालविला. इ. स १६९९ च्या वैशाख महिन्यांत त्यांनीं खालसा

पंथाची स्थापना केली व केशवगड मुक्कामावर त्यांनीं शिष्यांस खालील प्रकारें उपदेश केला:—

(१) तुम्ही आजपासून सोढ वंशाचे क्षत्रिय बनला आहां. तुमची पूर्वीची जातपात नष्ट होऊन आतां एकमेकांचे बंधु झाला आहां.

(२) ह्या पंथास 'खालसा' (पवित्र) अशी संज्ञा आज पासून प्राप्त झाली आहे.

(३) प्रत्येक खालसा धर्म मतानुयायानें आपल्या नांवाच्या अंतीं सिंह ही पदवी धारण करावी.

(४) अकालपुरुष, गुरु ग्रंथ व गुरु खालसा या तिघांसच पवित्र मानणें व अन्य कशावरहि विश्वास न ठेवणें.

(५) केश, कंगवा, कृपाण, कच्छ व कडा या पांच ककार दर्शक वस्तु शूरतेचें चिन्ह म्हणून प्रत्येक खालसाजीनें जवळ बाळगणें.

(६) अमृतपानानंतर कोणताहि मनुष्य 'सिंह' बनतो. ह्याकरितां प्रत्येक खालसाजीनें सिंहाप्रमाणें लढावें व शत्रूस कधींहि पाठ दाखवूं नये.

(७) मिणें, मसंद, विम्मळ, रामरागिये हे गुरु घरचे द्वेष्टे असल्यामुळें त्यांच्यापासून दूर राहावें.

(८) गाजा, तंबाखू, चडू, चरस, इत्यादि पदार्थ खाणें, पिणें व ओढणें हीं खालसा पंथानें महापातकें ठरविलीं आहेत.

(९) चोरी, व्यभिचार, असत्य भाषण यापासून दूर राहणें, अनाथ दीन अशा लोकांवर दया करून त्यांना अन्नवस्त्र दान करणें, परस्त्री माते समान मानणें; जितेंद्रियता बाळगणें; दुर्बलांचें रक्षण करणें; पर धनाचा अभिलाष न धरणें; वृद्ध आणि ज्ञानी लोकांचा मान राखणें ही प्रत्येक खालसाजींचीं कर्तव्ये होत.

(१०) खालसा पंथाना भ्रष्ट झालेला शीख, त्यानें पश्चात्ताप

दर्शविल्यास, पुन्हां पंथांत घेतला जाऊं शकतो. परंतु तत्प्रीत्यर्थ आपल्या प्राप्तींतील कांहीं भाग धर्म कार्यांत त्यानें अवश्य खर्च केला पाहिजे.

(११) खालसाजीनें केस कधींहि काढूं नयेत. अमृतसर हें पवित्र तीर्थ मानावें. शस्त्रास्त्रांची पूजा करून तीं सतत जवळ बाळगावी, जातिभेद मानूं नये.

(१२) पांच शीख एकत्र जमतील तेथें गुरूचें वास्तव्य राहील.

( पान १६ )

श्री. कानोले म्हणतात, " इ. स १६९६ वैशाख महिना रविवार हा दिवस शिखांच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिण्या सारखा आहे. ह्याच दिवशीं गुरु गोविंदसिंहानीं खालसा धर्माची स्थापना करून शिखांमध्ये अद्वितीय क्षात्रतेज निर्माण केलें. बाबा नानकाची शांत आणि धर्मपिपासू जनता श्री गुरु गोविंदसिंहानीं आपल्या अलौकिक चारित्र्य प्रभावानें ' सिंह ' या पदवीस पोंचविली. तोच हा शुभ दिवस. " ( पान १४ )

हा दिवस हिंदुस्थानच्या इतिहासांत महत्वाचा गणला जाईल. कारण पुढें शिखांनीं अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत अफगाणांच्या स्वाऱ्या परतविल्या व पंजाबांत एका प्रबल व संघटित राज्याची स्थापना केली व तें जवळ जवळ साठ वर्षे चालविलें. या सर्व गौरवाचा व वैभवाचा पाया त्या दिवशीं घातला गेला. त्या दिवसापासून शिखांच्या इतिहासाला नवें वळण लागलें.

या घोषणेनंतर लवकरच पहाडी राजांशीं गुरूंचा युद्ध प्रसंग आला. त्यांत राजांचा पराभव झाला. पुढें त्यांनीं मोगल फौजेची मदत मागितली. यामुळें मोगल साम्राज्याच्या एकवटलेल्या शक्तीविरुद्ध शिखांना सामना द्यावा लागला. ही लढाई इ स. १७०१ पासून चालूं झाली ती इ. स. १७०५ पर्यंत होती. मोगलांनी आनंदपुरास वेढा दिला. दोन वेढे अयशस्वी झाले; पण तिसऱ्या वेळेला ( १७०४ ) आनंदपूर सोडून गुरु गोविंदांना प्रयाण करावें लागलें. मोगलांनी त्याचा पाठलाग केला चमकोरच्या लढाईत गुरूचें

दोन पुत्र अजितसिंह व झुंझारसिंह मारले गेले. ( १७०५ ) दुसरे दोन पुत्र सरहिंदच्या सुभेदारांच्या हातांत सांपडले व या पुत्रांचा, जोरावरसिंह व फत्तेसिंह यांचा वध करण्यांत आला. त्यानंतर सरहिंदच्या सुभेदारानें गुरु गोविंदावर चाल केली; पण मुक्तसरच्या लढाईंत त्याचा पराजय झाला. ( १७०५ ) तेथून गुरु गोविंदसिंह हे दक्षिण पंजाबांत दमदमा या ठिकाणीं येऊन राहिले व तेथे दशम पादशाही व विचित्र नाटक इत्यादि ग्रथांचें लेखन त्यांनीं केलें.

या सुमारास अवरंगजेब दक्षिणेंत मराठ्यांवरील मोहिमेंत गुंतला होता. त्यानें गुरूंना बोलावणें पाठविलें पहिल्यानें त्यांनीं त्याच्या आमंत्रणाचा अव्हेर केला. पण पुन्हां निरोप आल्यावरून ते दक्षिणेकडे बादशहास भेटण्यास म्हणून निघाले. इतक्यांत अवरंगजेब बादशाह वारल्याची बातमी त्यांना कळाली. ( इ. स. १७०७ )

अवरंगजेबाच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलांमध्यें राज्याकरितां कलागती लागल्या. त्यांत थोरला राजपुत्र मोअज्जम ( बहादुरशहा ) यानें गुरूच्या मदतीची याचना केली. आग्र्याच्या लढाईंत आजम व मोअज्जम यांची लढाई होऊन आजमशहाचा पराभव झाला व तो मारला गेला. राजपुत्र कामबख्शहि असाच हैद्राबादच्या लढाईंत मारला गेला. व बहादुरशहा गादीवर बसला. गादीवर बसल्यावर बहादुरशहानें गुरूंचा सन्मान केला. व त्यांना सैन्यांत मोठ्या हुद्याची जागा दिली. ( The contemporary Historian Khafi Khan, who states that he (Govind) received rank in the Mughal army. ) कांहींच्या मतें गुरूंना बहादुरशहानें दक्षिणेंत पाठविलें. पण कांहींच्या मतें ते दक्षिणेंत बंदाबैरागी यांस भेटण्याकरितां म्हणून आले. नांदेड येथें त्यांचा मुक्काम असतां पठाणांनीं त्यांच्यावर प्राणघातक हल्ला केला. त्या जखमा वाढत जाऊन शेवटीं त्यांतच त्यांचा अंत झाला. ( १७०८ )

गुरु गोविंदसिंहाचें इतिहासांत काय स्थान आहे, त्याचें काय ध्येय

होतें व ध्येयांत त्यांना किमपत यश मिळाले हा मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे. गुरुगोविंदांना शिखांचें गुरुपद वडिलांकडून प्राप्त झालें होतें व त्यांच्या मागें सत्ता व वजन हीं अनायासे चालून आलीं होती. गुरु तेजबहादुरच्या मृत्यूनें त्यांच्या मनावर चिरकालीन परिणाम केला असला पाहिजे गुरु तेजबहादुरच्या मृत्यूची कारण-मिमांसा कानोल्यानीं केली आहे. पण ती एकांगी वाटते. निवळ काश्मीरी जनतेच्या विनंतीवरून कीं तेजबहादुरांचें धर्मांतर झाल्यास आम्ही धर्मांतर करण्यास तयार आहोत, व औरंगजेबानें तेजबहादुरला धर्मांतर करण्याबद्दल सांगितलें हें मनाला पटत नाही. हें विधान निसंशय एकांगी आहे मोगल इतिहासाचीं साधनें कानोल्यांनी हाताळलीं असती तर यांच्या या चरित्राला भरीवपणा आला असता खरी गोष्ट अशी की, जहांगीरच्या वेळेपासून शिखांचा संबंध राजकारणाशीं येऊ लागला होता. पंजाबांत त्यांना हळूहळू स्वतंत्र अस्तित्व येऊं लागलें होतें. गुरु तेजबहादुरच्या आहुतींत राजकीय व धार्मिक कारणाचें विचित्र मिश्रण झालें असले पाहिजे याबद्दल कानोल्यांनीं जरा जबाबदारपणानें लिहिण्यास हवें होते. असे म्हटल्या शिवाय राहवत नाहीं इतिहास म्हटला कीं त्यांत सत्याशिवाय दुसऱ्या कशाचेंच महत्व नाहीं. तेजबहादुरच्या जीवनाच्या आड निवळ धर्म कारण होते काय ? किंवा गुरु गोविंदसिंहांचा उद्देश निवळ आपल्या समाजाची संघटना करावी एवढाच होता काय ? पित्याच्या वधाची स्मृति गुरु गोविंदांच्या मनांतून कधींच नष्ट झाली नाहीं व ती होणें कधींच शक्य नव्हते. तत्कालीन राजकर्त्यांच्या नियंत्रणातून मुक्त व्हावें अशी आकांक्षा त्यांच्या मनांतून उदय पावली व या उद्देशानें त्यांनी पंजाबांतल्या पहाडी जिल्ह्यांतून आपली शक्ति वाढविण्या करितां पंधरा वीस वर्षें वास्तव्य केलें त्यांच्या वाढत्या शक्तिकडे मोगलांचें लक्ष वेधले व प्रथम त्यांच्या मांडलिक पहाडी राजांनीं व नंतर पंजाबच्या सुभेदारानें त्यांची शक्ति नष्ट करण्याचा प्रयत्न केला. याचा परिणाम असा झाला कीं त्यांना आनंदपूर सोडावें लागलें. पुढें बहादूर शहाशी त्यांचा समेट झाला व ते दक्षिणेत आले. गुरु गोविंदसिंह हे शूर सेनापति, राजकारणपटू व तत्वज्ञानी व पहिल्या प्रतीचे कर्मयोगी

होते. मुलाच्या मृत्यूची बातमी ऐकिल्यावर त्यांनीं मनावर त्याचा परिणाम होऊं दिला नाहीं. आपल्या दोन्ही मुलांस त्यांनीं आनंदानें रणांगणांवर जाण्याची परवानगी दिली. पित्याचा वध, पुत्रांचा वध, देशांतराची पाळी, पुत्रांचा रणांगणांत मृत्यू हीं संकटें त्यांच्यावर एकामागून एक कोसळलीं असतां त्यांनीं धीर सोडला नाहीं व आपलें कार्य अव्याहात चालू ठेविलें. तें कार्य कोणतें होतें ?

कानोल्यांनी त्यांच्या कार्याची रूपरेषा खालील प्रमाणें दिली आहे.

" त्यांची स्वदेश आणि स्वधर्म विषयक कामगिरी, पंजाबच्या स्वातंत्र्या करितां त्यांनीं मोगल साम्राज्याविरुद्ध चालविलेला लढा अद्वितीय शूरता व अलौकिक बुद्धिमत्ता आणि विद्वता याचा एक समयावच्छेदानें त्याच्या ठिकाणीं झालेला मिलाफ, विशेषता खालसा धर्म संस्थापक या दृष्टीनें त्यांचे इतिहासांतील उच्चस्थान. "

कानोल्यांच्या वरील शब्दांशीं कुणाचाच मतभेद होणें शक्य नाहीं. गुरु गोविंदाचा उद्देश शिखांचीं संघटना करणें हा होता. पितृवधानें त्यांच्या या उद्देशाला चालना मिळाली तरी पुढे संघटनेकरितां संघटना हाच उद्देश प्रबल झाला. पंजाबांत शिखांना स्वतंत्र अस्तित्व प्राप्त करून देण्याकडें त्यांनीं आपली सर्व शक्ति वेंचली. खालशाला शक्तिमान करण्याकरितां त्यांनीं केलेले उपाय पाहिले तर त्यांची गणना हिंदुस्थानांतील सर्वांत श्रेष्ठ अशा समाज सुधारकांत करण्याची इच्छा होतें. त्यांनीं जातिभेदाचें खालसांतून उच्चाटन केलें. क्षात्र तेजाची जागृति केली व एकीचा दिव्य मंत्र आपल्या समाजास दिला. सर्वांतर्यामी परमात्मा तोच आहे असें म्हणत व्यवहारांत जातिभेद पाळणारे ते पोकळ बडबड करणारे समदर्शिन:सुधारक नव्हते; तर आपले विचार कृतीत आणून दाखविणारे समवर्तिन:सुधारक होते. बेकीनीं बुजबुजलेल्या आपल्या समाजाला त्यांचा संदेश नेहमीच स्फूर्तिदायक ठरेल. त्यांचें कार्य बंदाच्या मृत्युनंतर पन्नास वर्षे पर्यंत सुप्तावस्थेंत राहिलें. इ. स. १७१९ मध्यें शिखांचा बीमोड असा झाला कीं, पन्नास साठ वर्षे पर्यंत त्यांनीं पुन्हां डोकें वर काढिलें नाहीं गुरु गोविंदाचें कार्य स्वप्नवत् झालें असतें.

भगवान बुद्धाच्या मागें अशोकानें जसें त्याच्या कार्याचा जगांत प्रसार केला तसेंच रणजितसिहानें केलें. पंजाबांत व हिंदुस्थानांत शिखांना मान्यता प्राप्त करून दिली. पण रणजितसिह झाला नसता तरी गुरु गोविंदाच्या कार्याचें महत्व कमी झालें नसतें. करारी योद्धा, उत्कृष्ट राजकारणपटु, मंत्रदृष्टा, समाजनेता, धर्मसंस्थापक व स्वातंत्र्यवीर गुरु गोविंदसिहाच्या चरित्रास हिंदुस्थानच्या इतिहासास तोड नाहीं. शिवाजी महाराज राज्यसंस्थापक होते, धर्मसंस्थापक नव्हते. बुद्ध हा धर्मसंस्थापक होता व त्यानें समाजांत जाति-भेद नष्ट करण्याचा महामंत्र सांगितला, पण तो योद्धा नव्हता, इतर आचार्यांनीं राजकारणांत भाग घेतला नाहीं व ज्यांनीं राजकारणांत कार्य केलें ते सुद्धां रास्त नव्हें; तर इतर राजांस हातीं धरून, चाणक्य व चंद्रगुप्त, अमात्यमाधवन् हरिहर, हीं उदाहरणें वरील प्रकारचीं आहेत. पण गुरु गोविंदांत "In him were united the qualities of religious leader and a warrior. He was a law giver in the pulpit. a champion in the field, a king on his Masnad and a fakir in the Society of the Khalsa." (पान ३९)

अशा या महात्म्याचें चरित्र लिहून कानोल्यांनीं एक मोठी कामगिरी बजावली आहे. मराठी वाङमयांत गुरुगोविंदाचें हेंच एक चरित्र असावें, यांतच कानोल्यांच्या कामगिरीचें महत्व आहे. क्वचित् प्रसगीं त्यांनीं अधिक साधनें हाताळावयास पाहिजे होतीं असें वाटल्या वांचून राहात नाहीं. तेगबहादूरचा मृत्यु हा प्रसंग आहे. क्वचित् प्रसंगीं त्यांनीं स्वतःचें मत न देतां दोन्ही बाजू मांडल्या आहेत. गुरुगोविंदाचें दक्षिणेंत कां आगमन झालें हा तो प्रश्न होय. क्वचित् प्रसंगीं त्यांनीं शिखांच्या वाढत्या अस्वस्थतेचा साहजिकपणा स्पष्टपणें दाखविला नाहीं. हें लहानसें चरित्र एक विहंगम अवलोकन आहे. हें कबूल करूनही या गोष्टीचा निर्देश करण्यास हवा होता. तसेंच जेथील बहुजन समाज धर्मानें भिन्न होता असा पंजाब स्वतंत्र करणें हें गुरुगोविंदाचें ध्येय होतें कां आपल्या समाजाला संघटित करून पंजाबांत प्रबल करण्याचें होतें कां फक्त आपल्या समाजावर होत असलेल्या जुलुमाचा

प्रतिकार करावयाचा होता, कां आपल्या पंथाचा प्रसार करावयाचा होता, याची स्पष्ट रूपरेषा कानोल्यांनीं दिली नाहीं. माझ्या मतें आपल्या समाजावर होणाऱ्या जलुमापासून त्याला मुक्त करून आपला समाज जगाच्या व्यवहारात प्रबल व्हावा एतदर्थ त्यात क्षात्रतेजाची फुंकर मारून त्याला देशांत सामाजिक व राजकीय महत्व प्राप्त करून देणें हें गुरुगोविंदांचें ध्येय होतें. अल्पसंख्यांक शिखांचें पंजाबांत एकमेवाद्वितीय असें राजकीय वर्चस्व स्थापून रणजितसिंहानें गुरुगोविंदांचें ध्येय उत्कृष्टपणें तडीस नेलें. शिवाजी महाराजापुढें देशस्वातंत्र्याची कल्पना होती. पण गुरुगोविंदापुढें पंजाबांतील भिन्नधर्मीयांची संख्या पाहतां देशस्वातंत्र्याची कल्पना होती असें वाटत नाहीं. आपला समाज प्रबल सुसंघटित व राजकीय दृष्टया महत्वाचा व्हावा हीच त्यांची इच्छा होती. धर्मप्रधान समाजाला राजकीय वर्चस्व प्राप्त झाल्याशिवाय त्या समाजाला टिकाव लागणें शक्य नाहीं हें त्यांनी ओळखलें व त्याकरितां त्यांनी आपलें सर्व आयुष्य वेचलें यामुळे शिवाजी महाराजांची व गुरुगोविंदांची भूमिका भिन्न होती असें वाटतें. पंजाब व महाराष्ट्रांतील मुसलमान समाजाच्या संख्येच्या मुळेंच ही भूमिका भिन्न झाली असें म्हणतां येईल.

याचें विवेचन कानोल्यांनीं केलें असतें तर बरें झालें असतें असें वाटतें. कारण हा मुद्दा अत्यंत महत्वाचा आहे त्यामुळें कानोल्यांचा दृष्टिकोन किंचित भिन्न वाटतो. कानोल्यांची भाषा ओघवती आहे. त्यांचें लिखाण म्हणजे गोदावरीचा अखंड प्रवाहच इतिहास संशोधकांतला कोरडेपणा त्यांच्यांत नाहीं. त्यांनी आपल्या जिवंत भावना या चरित्रांत ओतल्या आहेत. परिच्छेद या दृष्टीनें फार वाचनीय आहे. त्यांच्या इतर लिखाणांतही जिव्हाळा दिसून येतो. नांदेड भागांतील कवी असोत वा संत, हंसराज सदानंद, प्रल्हाद सोनार व वामन पंडित इत्यादि कवीविषयींच्या लिखाणांत ते या मंडळीशीं समरस होऊन जातात. त्यांच्यांत संशोधकाच्या कष्टाळूपणा बरोबर वाङ्मयसेवकांच्या जिव्हाळ्याचें मिश्रण झालें आहे. त्यांचे इतर लेख यांची साक्ष देत आहेत. ते सर्व लेख

त्यांनीं एकत्र करून संकीर्ण निबंध म्हणून छापावेत अशी त्यांना आमची आग्रहाची विनंति आहे त्याचें नांदेड येथील घर मराठवाड्यांतील अभ्यासी लोकांना यात्रेचें स्थान झालें आहे व त्यांच्या तेथील वास्तव्यामुळें नांदेडच्या विद्वानांची परंपरा अखंड चालली आहे. याची जाणीव मराठवाड्यांत आहे. पण बाहेरहि हें कळण्याकरितां त्यांचा निबंध संग्रह प्रसिद्ध होणें आवश्यक आहे. मराठवाड्यांतील या इतिहास संशोधकाला प्रणाम असो.



# श्री. भगवान रघुनाथ कुळकर्णी.

ज्याप्रमाणें मराठवाड्यांतील उदयोन्मुख कवींत वा. रा. कांत यांची प्रामुख्यानें गणना करावी लागते त्याप्रमाणें मराठवाड्यांतील उदयोन्मुख गद्य लेखक कोण असें विचारल्यास परभणीचे भगवान रघुनाथ कुळकर्णी उर्फ बी रघुनाथ यांचा नाम निर्देश करणें भाग आहे. बी. रघुनाथ यांनी काव्य रचना केली नाहीं असें नाहीं. फुलारी या नावांखालीं त्यांनीं केलेल्या कविता किती तरी लोकप्रिय झाल्या होत्या.

होतात येरझारा दाराहुनी किती
मधुमास जीविताचे मिटलेच राहती ॥

हें भावगीत अथवा स्मृतीच्या ग वेली खालीं
बांधली समाध प्रीतीची
वरी भूल हो जिवाची घातली ॥

ही कविता वाचून फुलारी हे मराठवाड्यांतील तरुण कवींत मानाची जागा लवकर पटकाविणार असें वाटलें होतें. पण लवकरच बी. रघुनाथांना

कवितांचा कटाळा येऊन त्यांनीं आपली दृष्टि गद्यलेखनाकडे वळविली. त्यांच्या लघुकथा निरनिराळ्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या असून त्यांनी वाचकांचें लक्ष आपल्याकडे वेधून घेतलें आहे. प्रेम आणि म्हातारें, पांखरूं व पारधी, बेगम सकीना, जग कोणीकडे चाललें आहे, या लघुकथा अव्वल दर्जाच्या मानण्यांत येतात. प्रादेशिक वातावरणाचें हुबेहुब चित्रण हे बी. रघुनाथ यांच्या लिखाणाचें प्रमुख वैशिष्टय म्हणतां येईल. अजून त्यांचा लघुकथा संग्रह झाला नसल्यानें (तो आतां प्रसिद्ध झाला आहे. प्रकाशक) त्या लघुकथांविषयीं तपशीलानें लिहितां येत नाहीं. पण त्यांची एक कथा 'ओऽऽ' ही नुकतीच प्रसिद्ध झाली आहे व त्यांतच बी. रघुनाथांच्या लिखाणाचें वैशिष्ठय आपल्याला शोधावें लागेल.

'ओऽऽ' च्या कथानकाला सुरवात आगगाडींत होते व शेवट ही आगगाडींतच होतो. सुरूपचद्र हा क्रांतिकारी युवक हा विनतिकिटाचा असा गाडीत प्रवास करीत असतो. गाडींत त्याला नाना मार्डीकर, नूरनगर येथील शाळेचे हेड्मास्तर भेटतात. प्रवासांत त्यांचा वेळ मोठ्या मजेंत जातो व त्यांच्या व्यक्तित्वाचा मनावर परिणाम होऊन नानासाहेब त्याला नूरनगर येथें उतरून आपल्या घरीं कांही दिवस राहण्याचा आग्रह करतात. सुरूपचंद्र आपण ह्यूम पाइप कंपनीचे एजंट आहोंत असें भासवितो. या दाढी वाढविलेल्या रुबाबदार तरुणाविषयीं आपल्याला काय वाटतें हें नानासाहेब आपल्या पुतणीला, आभावतीला, लिहिलेल्या पत्रांत खालील शब्दांत लिहितात.

ज्वलत् वैचारिक आणि कृतिपर जीवनाची अनिवार ओढ, प्रखर राष्ट्रीय भावना, संगीताची आवड अन् त्यांतलें कौतुकास्पद गम्य अशा कांहीं गुणांचा समुच्चय या दाढींत आहे....प्रामाणिकपणा अन् सामाजिक राजकीय विषयावर बोलतांना त्याच्या डोळ्यांत प्रदीप्त झाल्यासारखी वाटणारी अपूर्व मोहक ज्वाला यामुळें त्याचें भाषण फारच विलोभनीय अडबांध गरून वीस पंचवीस वर्षांपूर्वींच्या स्वप्न भूमींतच जणूं मी माझ्या वाटलें. अन् कित्येक वेळां असाही भास झाला कीं आशाहीन वर्तमानाचें

सहकाऱ्यासह वावरत आहे ! अन्‌राष्ट्रीय भावनांनीं नसनसांत मी अगदी फुलून गेलों आहे ”

असा हा तरुण नानासाहेबांपासून निघून फलकपूरला येतो. या क्रांतिकारी तरुणाचा कॉलेज जीवनापासून निकटची मैत्रीण सुमा येवलेकर, नवऱ्यानें सोडल्यामुळें संगीताचा वर्ग चालवीत असते. तिच्या भेटीस तो जातो.

“ दिव्यावर झेप घेणाऱ्या पतंगासारखे तिचें लुब्ध, भुकेलें हृदय आत्मसमर्पणासाठीं पुन्हां जागें झालें ! सारे सामाजिक संकेत, मर्यादा, बंधनें झुगारून, सफलतेवांचून हुरहुरत पडलेलें, अतृप्त वासनांच्या कल्लोळानें व्याकुळ झालेलें आपलें जीवन–कुसू सुरूपच्या स्वाधीन करावें, अन्.. पण प्रीतीचें सुख तिच्या नशीबी नव्हतें ! पुन्हां तिच्या रात्रीं नेहमींच्या असमाधानानें हुकारत राहिल्या !”

या देखण्या, गानलुब्ध, क्रांतिकारी तरुणाचें प्रेम आभावतीवर जडलें होतें. ज्वलन जहाल विचारांची व अजून अभ्यास करीत असलेली ती तरुणी म्हणजे नानासाहेब मार्डीकरांचा पुतणी होती. नानासाहेबांकडून घेतलेले चाळीस रुपये आभावतीस परत देण्याच्या निमित्तानें झालेल्या पत्रव्यवहारावरून त्यांची गांठ पडली. नूरनगरला असताना नानासाहेबांच्या केलेल्या वर्णनावरूनच सुरूपचंद्राच्या मनात आभावतीबद्दल कुतूहल निर्माण झाले. त्यावेळची त्याची स्थिति खालील शब्दांत वर्णिली आहे.

“ ज्या आभावतीला आपण कधीं पाहिलें नाहीं तिजविषयी आपल्या मनांत विचार तरी कां असावें, हें मला समजेनासें झालें. बुरख्यांतल्या युवतीचें ओझरतें हसू दिसावें, तशा क्षितिजाच्या कडा उजळलेल्या दिसल्या. वद्याष्टमीचा चंद्र हळुं हळूं वर सरकू लागला..... त्या चंद्रबिंबांतून एका परिणत यौवनेचें चित्र मला दिसूं लागलें..... कसलें तरी रोमांचकारी क्रांत्युन्मुख गीत ती गुणगुणत होती......तिचे प्रेरकशील नेत्र जीवनाचें प्रदीप्त स्फुलिंग फुलवीतच उघडत मिटत होतें कीं काय न कळे ! हातात

क्षितिजाच्या या कडेपासून त्याकडेपर्यंत पसरलेलें एक तिरंगी निशाण होतें आणि त्याची फडफड सबंध विश्वात निनादत होती. सौंदर्याच्या सामान्य सीमा पलीकडलें कांही तरी स्वर्गीय, स्वप्नरम्य, भावरम्य, अनुपम, अभिजात आणि मधुरोत्कट असें तिच्या रूपात होते."

पुढे आभावतीशीं त्याचा वादविवाद झाला. दुसऱ्या खेपेस सुरूपनें तिला मिरवणुकीच्या अग्रभागी झेंडा हातांत धरून गाणे गात जात असतांना आभा दिसली. नंतर त्याच्या वारंवार गांठी भेटी पडल्या "कांहीं विशाल कल्पना, उदात्त आकांक्षा, उच्चतर ध्येये, यांनीं सतत प्रेरक आणि पूरक ठरणाऱ्या, कांही तरी दैवी अंश घेऊनच अवतरलेल्या स्त्री सौंदर्याचे क्षणिक सान्निध्य देखील किति श्रेष्ट प्रकारचें! माझ्या आजवरच्या आयुष्यांत अशा प्रकारची सौंदर्यशालिनी मला कोणी भेटली असेल तर ती फक्त आभावती,"

पुढे सुरूप नागपूरकडे जातो. त्याचे सहकारी एका मागून एक पकडले जातात व त्याच्या पाठीमागे पण पोलिसांचा ससेमिरा लागतो. अशा परिस्थितीत तो आभाला एक दिवसाकरिता भेटून जाण्याकरितां बोलावतो ती जाते व एक रात्र त्याच्यापाशीं राहून परत येते "तुझ्या त्या एका रात्रीच्या सान्निध्यानें भविष्यांतल्या कैक रात्री उजळून गेल्यासारख्या मला दिसल्या . .. स्वर्ग आणि स्वप्न यांना सारखेच पूरक ठरणारे तुझे तें अनुपम लावण्य .. आभा, माझ्या प्रीतीला तूं होकार दिला आहेस तो कोणत्या जीवनाच्या संमोहानें ? माझ्या असमाधानाची छाया तुझ्या जीवन पथावर पसरलेली पाहणें मला कालत्रयी ही रुचणार नाही " तिची गाठ पडत नाही व पडण्यासारखी परिस्थिती नाहीं हें पाहून सुरूपचें मन तळमळून येतें व तो म्हणतो, "आभा आपले आयुष्य म्हणजे आपणच घातलेल्या अनंत आर्त हाका आहेत नुसत्या जीवनाच्या अस्तमानापर्यंत त्या हाकांना 'ओ' ऐकण्याची आपली धडपड संपत तर नाहीच पण जीविताच्या सूत्र धारांत आपली प्रत्येक हाक मोठ्या आस्थेनें ऐकून, तेवढ्याच तत्परतेने ओ दिली आहे असेंही कधीं अनुभवास येत नाहीं !

पुढें सुरूपला पकडण्यांत येतें. आभा ही मजूर परिषदेच्या कार्यांत पकडली जातें, नाना गाडीकरांचा एका जातीय दंग्यांत बळी पडतो सुरूपला पकडून गाडीतून नेत असतां फलकपूरच्या स्टेशनावर सुमाची व त्याची एक क्षणा करताच गांठ पडते व गाडी पुढें निघून जाते.

असो एकदरीत या कादंबरीचा नायक सुरूपचंद्र व नायिका आभावती हीं आहेत आभावतीविषयीं माहिती मिळते ती हीच कीं, नाना साहेबांची ती पुतणी, फलकपूरला अभ्यासासाठीं राहिलेली असते, उज्ज्वल विचाराची व देशासाठी तळमळणारी ती एक तरुणी असते. मजुरांच्या चळवळींत ती लक्ष घालीत असते व शेवटीं त्यांत पकडली जाते. ती रसिक वृत्तीची तरुणी आहे खोलीची सजावट करण्यांत ती तरबेज आहे. (पान ५५) तिच्या रूप वर्णनांत वी. रघुनाथांनीं आपली पूर्ण प्रतिभा खर्ची घातली आहे. पण इतकें असूनहि आभावतीचें पात्र ठसठशीत असें निर्माण झालें नाहीं. सर्व लघुकथा वाचून खालीं ठेवल्यानंतर आभावतीविषयीं काय वाटतें? सारें चित्र विरविरीत वस्त्राखाली झांकलेलें. आकृति मोहक असावी असें वाटावें, अस्पष्टपणें व दुरून कुठून तरी मधुर हास्याच्या लहरी निघून वातावरण प्रसन्न करताहेत असें वाटावें पण त्याची स्पष्ट रूपरेषा समजूं नये. बिनमोल अशा बुरख्याखालीं ती आकृति लपलेली असावी व आपल्याला या तरुणीचें सौंदर्य पाहाण्यास सांपडूं नये याची हुरहुर लागावी तद्वत् आभावतीचें पात्र पाहून वाटतें. आधीं या कथेंतील ठळक पात्रें म्हणजे सुरूपचंद्र, आभा, सुमा व नाना. बाकींच्या विषयीं तर जास्त विचार सुद्धां करतां येत नाहीं. पण असलेली ही चार पात्रें सुद्धां एक धूलिधूस असलेल्या मोहक आवरणाच्या आंत लपेटलेली वाटतात. सुरूपचंद्राचा क्रांतिवाद सुद्धां चंद्र प्रकाशांतील या अद्‌भुत व अननुभूत वातावरणांत विलीन झाल्यासारखा वाटतो. तो स्वभावतः रसिक आहे. भावनावश आहे. स्वप्नरंजित सृष्टीचा उपभोग घेण्याइतका तो काव्यप्रिय आहे. आभाला पाहण्यापूर्वींच तिच्याविषयीं तो विव्हल होतो. सुमा येवलेकर सारख्या दीर्घकालीन मैत्रिणीविषयीं त्याला प्रेम भावना वाटत नाहींत; पण त्या उलट जिला कधींच पाहिलें नाहीं, अशा आभाविषयींचें पूर्ण

चित्र तो मनानें उत्पन्न करतो नि त्यांत रंगून जातो. त्याला कारण म्हणजे चंद्राविषयीं त्याच्या मनांत आसक्ति होय. आपल्या पत्रांत त्यानें ही गोष्ट स्पष्टपणें सांगितली आहे. चतुर्थीच्या चद्रावरून त्याचें नाव सुरूपचद्र ठेवण्यांत आलें. " मला आई नमली तरी एखाद्या प्रेमळ स्त्रीच्या कौतुकलेल्या स्पर्शा इतकेंच त्या चंद्र प्रकाशाच्या स्निग्धतेनें मला सुखविलें आहे. आणि चद्राकडे बघून आईची उणीव मी कैक वेळा विसरलों आहे .....या नंतर अभ्यासून कंटाळलेल्या रात्री येऊ लागल्या मित्रांच्या सगतींतील अनुभवलेल्या गमती, मानसिक वातावरण फुलारून टाकणाऱ्या हमऱ्या नाजुक मनाच्या मैत्रिणीचा सहवास, यांही गोष्टीचा पुन्हां प्रत्यय चद्र दर्शनानें लाभला .. काहीं तरी अधिक निकटच्या वाटणाऱ्या स्नेहमय भावनायुत शब्दांची वाट पाहात मी शय्येवर पडलों आहे, तोंच काय चमत्कार, चद्रबिंब आपल्या सौम्य मनोहर तेजानें नटलेलें दिसून सारी सृष्टि दिव्य शांतींत विलीन होत आहे, अन् माझी सारी चलन शक्ति जादूनें भारल्यासारखी होऊन मी सवेदन रहित होत आहे. अशा तऱ्हेचा अनुभव त्यावेळीं येत असे.

चंद्र प्रकाशाची इतकी आवड सुरूपला होती. यावरून सिनेमातील बंगाली पदाची आठवण होते.

जे लगने जनम निलाम येदू दुनियार घरे
चांद उठेचिलो गगने ।

पण चंद्र प्रकाश मनोहर व विलोभनीय तरी. त्या प्रकाशांतील सर्व वस्तु अस्पष्ट, आकर्षक नि अतएव अद्भुत वाटतात. चंद्रप्रकाशांतील वस्तूंत नि सूर्याच्या प्रखर प्रकाशांत पाहिलेल्या त्याच वस्तूंत व्यवहार व काव्य, भावना व बुद्धि इतपत फरक पडतो ज्या चंद्रप्रकाशाकडे सुरूपला इतकी ओढ त्याची जीवनाकडे पाहण्याची दृष्टीच अद्भुतरम्य होती यांत शका नाहीं. त्यांचीच काय पण श्री रघुनाथांचीच ओढ अद्भुतरम्यतेकडे असावी असें वाटतें. कोणत्याही पात्राचे रेखीव अवयव उघडून दाखवन त्यांचीं सुख दु.खें, त्यांचे भलेबरे व्यवहार व त्याची इच्छा आकांक्षा वाचकांसमोर आणून

वाचकासारखींच तीं माणसें आहेत हें न दाखवितां केवळ आभासमय असलेली आभावती, या आभासावर प्रेम करणारा सुरूप व त्याच्यावर प्रेम करणारी सुमा हीं मोहक व साजरीं पण अस्पष्ट पात्रें निर्माण करून व त्यावर चंद्रप्रकाशाचें झिरझिरीत आवरण टाकून बी. रघुनाथांनी आपली अद्‌भुताची ओढ दाखविली आहे. अशा या गोड, चटका लावणाऱ्या पण अस्पष्टपणामुळें बी. रघुनाथांची तुलना वामन चोरघड्यांशी करण्याचा मोह होतो. बी रघुनाथांची शब्द सृष्टि केवळ मनोहर आहे. त्यांच्या उपमा बहारीच्या आहेत. दिवाकर कृष्णांना हेवा वाटावा इतकी तयारी त्यांनी या बाबतींत कमावली आहे.

"एखाद्या म्हाताऱ्या बाईनें चालतां चालतां एकदम अवसानहीन होऊन मटकन्‌खालीं बसावें, तसा सूर्यास्त झाला.", "वनवासी सीतेसाठी हनुमता बरोबर द्यावयाला रामचंद्राजवळ मुद्रिका होती! अलकापुरीकडे निघालेल्या मेघदूताजवळ, आपल्या प्रियतमेला निरोप म्हणून द्यावयाला, बहिस्त यक्षाजवळ निदान शब्द तरी होते—पण, सुरूप!", बुरख्यांतील युवतीचें ओझरतें हसू दिसावें, तशा क्षितिजाच्या कडा उजळलेल्या, आभाळ तर असें कांही चमत्कारिक झालें कीं, केव्हांहि त्याकडे पाहिलें कीं एखाद्या भल्या मोठ्या पिंजऱ्यांत जबरदस्तीनें कोंडल्यासारखें वाटावें, एखाद्या सुंदर वाटिकेवर आकस्मित अंधार पडला जावा, धड फुलेंहि नाहींत आणि फिरण्याचेंहि सुख नाहीं अशाच तऱ्हेनें आयुष्य तिच्या वांट्याला आलें होतें. "हें जीवन म्हणजे सदैव रिकामा राहणारा एक कलशच नाहीं का? आपल्या जीविताचा घट केवळ मधूनें अन् तो ही कांठोकांठ भरून असा कोण चालता झाला आहे."

अशा किती तरी मनोहर वाक्यांची पाखरण बी. रघुनाथांनीं खुल्या हातानें केली आहे. या लहान वयांत त्यांच्या या कृतीकडे पाहून त्यांच्या उज्वल भविष्याबद्दल आशा वाटते. या तरुण लेखकाचें स्वागत असो.

# मराठी वाङ्मयांतील आपल्या विषयींचे उल्लेख

गेल्या कांहीं वर्षांपासून मराठी साहित्यांत बऱ्याच पुस्तकांची दरवर्षी भर पडत चालली आहे. विशेषत: कादंबऱ्या व लघुकथांनीं तर या बाबतींत आघाडी मारली आहे, या कादंबऱ्या व लघुकथांत वर्णिलेले प्रसंग व घातलेली पार्श्वभूमि पाहून कांहीं ठळक सिद्धांत काढतां येण्यासारखे आहेत. आजच्या लेखांत फक्त एका विषयाविषयीं विवेचन करणें आहे आणि तो विषय म्हटला म्हणजे ललित वाङ्मयांत मराठवाड्याविषयीं व एकंदरीत निजाम प्रांताविषयीं कांहीं उल्लेख आहेत कां व असले तर ते कशा प्रकारचे आहेत. या वरून लेखनाचा विषय मर्यादित आहे हें दिसून येईल. गेल्या पांच सात वर्षांत माझ्या नजरे खालून जवळ जवळ दोन अडीचशें कादंबऱ्या व तीस बत्तीस लघुकथांचे संग्रह गेले आहेत त्यांत दहा पांच पुस्तकांमधूनच काय ते हैद्राबादे विषयीं व मराठवाड्यांतल्या गांवाविषयीं उल्लेख आढळून आले. अर्थात् मी वाचलेल्या पुस्तकांविषयींच मी लिहीत आहे.

ग. हरिनारायण आपटे यांच्या "मधली स्थितींतला" खलपुरुष गोविंदराव हा अनन्वित कृत्ये करून तीं पचविण्यासाठीं म्हणून मोगलाईंत म्हणजे हैद्राबादेस जातो आहे असें दाखविलें आहे पण पोलीसांच्या कौशल्यानें त्याला पुण्यालाच स्टेशनवर पकडण्यांत आलें व मोगलाईंत जाण्याचा त्याचा बेत ढासळला फडक्यांच्या कादंबऱ्यांत हैद्राबादेविषयीं उल्लेख बरेच आढळतात याला कारण त्यांनीं केलेला हैद्राबादचा प्रवास दिसतो. अनाशिवाय 'साहित्य आणि संसार' पुस्तकांत त्यांनीं लिहल्याप्रमाणें हिंदुस्थानांतील निरनिराळीं स्थळे कादंबऱ्यातून घातल्यामुळें वाचकाचें लक्ष कादंबरीकडे वेधते. त्यांच्या काश्मीरी गुलाब कादंबरींतल्या मिसेस लीलावती धारकर या हैद्राबादचे अधिकारी धारकर याच्या पत्नी आहेत असें दाखविलें आहे. पण मिसेस धारकरांचा उल्लेख त्यांच्या मुंबईच्या वास्तव्याच्याच वेळचा दाखविल्यामुळे हैद्राबादचा उल्लेख नुसता पुसट आला आहे. फडक्यांच्या 'प्रवासी' कादंबरीमध्ये चंचल बांदकराला हैद्राबादेच्या कोण्या जाहगीरदाराने मागणी घातली आहे व तिच्या करिता तीस हजार रुपये बँकेत ठेवले आहेत. चंचल बांदेकरनें हैद्राबादच्या त्या जहागीरदाराची मागणी कबूल केला व राजा भाऊ (नायक) याला सोडून ती हैद्राबादेस निघून गेली पुढें बरेच दिवस पर्यंत तिचा व त्याची गाठ पडली नाही आणि नंतर पडली ती लीलाबाईंच्या घरीं मुंबईस हैदाबादचा जहागिरदार मेल्या वर ती दुसऱ्या जहागीरदाराकडे जाऊन राहिली तो क्रूर होता शिकार करणें, मद्यपान करणें, व सुखोपभोग करणें हें सर्व तो इतक्या आवेशानें व क्रूरपणाने करी की चंचल झुरणीस लागली.

अशी हकीकत फडक्यांनीं रंगविली आहे त्याच्या बारा तेरा कादंबऱ्या मधून आल्हाहाबाद कलकत्ता, लाहोर, ओरिसा, मद्रास, सिंध वगैरे सर्व प्रांताचे उल्लेख आहेत पण हैद्राबादेविषयीं उल्लेख काय ते 'उद्धार' व 'प्रवासी' मध्यें आढळतात. आणि ते उल्लेख म्हणजे अशा प्रकारचे. नाहीं म्हणायला त्यांच्या संजीवन नाटकाची पार्श्वभूमी ही सर्व हैद्राबाद संस्थानांतली आहे. हैद्राबाद, विकाराबाद, वगैरे स्थळें त्यांत आलीं आहेत व कांचन

हैद्राबादचाच दाखविला आहे. हें सर्व वाचतांना निजाम प्रांतीयांना एक प्रकारचा आपलेपणा वाटतो.

सध्यां मराठी वाङमय क्षेत्रांत चमकणारे लेखक म्हणजे जोशी, फडके, खांडेकर, माडखोलकर, वरेरकर वगैरे कादंबरीकार व जोशी, दीडकर, सरदेसाई वगैरे लघुकथा लेखक होत. नाटककारांत अत्र्याचे नाव सर्वतोमुखी आहे हें सांगावयास नकोच त्याच्या वाङमयीन प्रतिभेच्या विहाराला महाराष्ट्र सोडून द्या, हिंदुस्थान पुरत नाहीं; पण मराठवाड्याच्या जीवनाचे पुसट सुद्धां चित्र त्यांच्या वाङमयात उमटत नाही, हे केवळ मराठवाड्याचें दुर्दैवच समजायचें कां कट समजायचा ? तेलगण प्रांता विषयीं एकच उल्लेख माझ्या वाचनांत आला श्वेतांबरा कादंबरींतील खल पुरुष मोकाशी हा तेलगण प्रांताचा रहाणारा असून त्याचें मूळ नांव राजय्या पोपटय्या होतें. तो एका क्रांतिकारक टोळीचा सभासद होता असें दाखविलें आहे तेलंगणामध्ये पोपटय्या हे नाव कधीं सांपडेल की नाही शकाच आहे यापेक्षां ही विस्मय कारक गोष्ट म्हणजे लेखकांत हैद्राबादच्या भूगोलाचें शोचनीय अज्ञान होय. जानकीबाई देसाईची 'पातिव्रत्याचा कसोटी ' ही कादंबरी याचें उत्कृष्ट उदाहरण आहे नायक बापूसाहेब हे निजाम इलाख्यात तुगभद्रेच्या काठी मुर्शीराबाद येथे राहतात ते जव्हेऱ्याचा धंदा करीत पण परिस्थिति खालावलेली होती. त्यांची पत्नी इंदिरा ही अतिशय सुंदर व सुशील दाखविली आहे. दुर्दैवाने बापूसाहेब आजारी पडतात. व त्याना औषध पाण्याची पण पंचाइत पडते इ घरांत एक नोकर व मोलकरीण यांशिवाय दुसरें कोणी नसते मग इंदिरा शेवटी डोक्यावर बुरखा घेऊन तेथील हकीम हाफीज याजकडे दिलेले कर्जाचे पैसे परत घेण्याकरिता जातें तो तिच्याशीं अधिक प्रसंग करण्याचा प्रयत्न करतो. पण ती तेथून निसटते व गांवचे काजीकडे दाद मागण्यास जाते हा काजी गांवचा न्यायाधीश असतो. याची एक प्रिया जुलेखा म्हणून होती. पण तिनें याला सोडून निजाम साहेबाच्या मेहुण्याशी लग्न लाविलेलें आहे. त्यामुळे काजी विरह दुःख भोगीत असतो. काजीची नजर इंदिरेवर पडते व तो तिची अभिलाषा धरतो व हकीमाशीं कारस्थान करतो.

बापू साहेबाला आजारी अवस्थेत त्याला विष देऊन मारण्या करितां काजी हकीमाला त्याच्याकडे पाठविते. पण हकीम त्याला फक्त चोवीस तास सुतवत पाडील असे औषध देतो. पुढे काजी व हकीम हे दोघे बापूसाहेबांचें प्रेत उचलून जवळच असलेल्या तुंगभद्रेंत टाकतात. काजी इंदिरेला आपल्या घरी नेऊन ठेवतो. बापूसाहेबाचें शरीर वहात वहात निजाम सरकारच्या उद्यानात येतें "बापूसाहेबाचा मूर्छित पण अक्षत देह तुंगेच्या एका मोठ्या नाल्यांतून वहात वहात तीरावर असलेल्या निजाम सरकारच्या एका उद्यानात आला. तुंगेच्या तीरी शहांनीं एक टोलेजंग वाडा बांधला होता व त्या ठिकाणी ते केव्हा केव्हा येऊन राहात. त्यांचें तें राहाणें अत्यंत गुप्त असल्यामुळें सेनापती व प्रधान याच्या शिवाय इतर कोणालाही माहीत नसे" पुढे मग निजाम सरकारनी काजीला पकडलें व बापूसाहेब व इंदिरेचें मीलन करून दिलें. हकीमाला पश्चात्ताप झाला. मुशीराबादेहून निघाला तो बऱ्याच दऱ्याखोऱ्या ओलांडून निजाम सरकारच्या उद्यानांत पोहोंचला वगैरे. तुंगभद्रा कोप्पळपाशी निजाम इलाख्यात येऊन अलमपूरपाशी कृष्णेस येऊन मिळते. तिच्या काठावरची दरी खोरी, किंवा निजाम सरकारचा बंगला की जेथील वास्तव्याची माहिती प्रधान व सेनापती याशिवाय दुसऱ्याला नाहीं हें सर्व माझ्या प्रवासात मला आढळले नाही. अशी विकृत माहिती गैर समजाला कारण होतें "माझे रामायण" कादंबरीतील पार्श्वभूमी कुठली आहे हें सांगणें नकोच.

आपल्या येथील फिरस्त्याच्या "मेळ्यांत" मात्र खास मछली कमानची छटा उतरली आहे. बिदाई जलसा, कर्दाम वाद, व मोटार सर्व्हिस वगैरे लेख प्रादेशिक वाङ्मयाची वैभवस्थानेंच आहेत असें म्हटलें पाहिजे मराठी लघुकथामधून सुद्धां मराठवाड्याविषयीं उल्लेख फारच कमी आढळतात. राजहंस मासिकांत कांहीं लघुकथांमधून हैद्राबादची पार्श्वभूमि घेतली गेली आहे. तरी पण स्थानिक लघुकथा लेखकानी सुद्धां या बाबतींत महाराष्ट्रांतील लेखकांची विचारसरणीच ग्रहण केली आहे 'प्रेम लाभे प्रेमळांना' या लघुकथेंत खलपुरुष हा हैद्राबादचा एक जहागिरदार दाखविला आहे. तो उर्दू

मिश्रित मराठी बोलणारा, व निर्जीव दाखविला आहे तो मेल्यावर नायकानें नायिकेशीं पुनर्विवाह लाविला आहे असें दाखविलें आहे. एका लघुकथेंत नायक एच. सी. एस. झाला आहे असें दाखविलें आहे. मागे 'यशवंत' मध्यें (मला नक्की आठवत नाहीं) 'पद्मिनी फिरती दारोदार' का अशा लघुकथेतील फौजदार प्रवाशाला विचारतो,

"कुठले राहणारे"

"उरुस--गांवचे"

"ह:--मस्थानी प्रजा"

स्वरातला उपरोध अंत:करण भेदल्याशिवाय राहात नाहीं गुलबर्ग्यांचे श्री. रॉय किणीकर हे सुद्धां एका नाटिकेंत हैद्राबादच्या जहागिरदारानें नायिकेला मागणी घातल्याचें दाखवितात व याचा परिणाम नायकाच्या मनावर झाला असें सूचित करतात त्यांच्या इतर लघुकथा किंवा कादंबऱ्या अजून माझ्या पाहण्यांत आल्या नाहींत पण त्या मधून सुद्धां या प्रांताचें वातावरण चित्रिलें गेलें नाहीं असें समजतें एकूण काय की कादंबऱ्या काय की लघुकथा काय, चाळीस लाख लोकांना मराठवाडा अनुल्लेखानें मृतवत् झाला आहे.

काव्यांमधून सुद्धा हीच हाकाटी दिसून येते नांदापूरकरांच्या 'वाग्विलासांत' 'पूर्णा काठी' कविता पूर्णा नदीला काठ डोळ्या समोर आणते, कांत यांचें गोदागीत गोदावरी नदीचा मदगर्भार ध्वनि कानात घुमवितें, झालें, बाकीच्या कवींनीं या प्रांतापासून स्फूर्ति घेणें टाळल्या सारखेच दिसतें. रा महाजनांना सिंहगडापासून स्फूर्ति मिळते पण परांडा, देवगिरि, वगैरे इतिहास प्रसिद्ध किल्ले कांहींच संदेश त्यांच्यापाशी पाहोंचवीत नाहींत. कै. नरसीकर यांनी देवगिरि काव्य लिहिलेलें माझ्या पाहण्यांत आलें आहे. पण तें छापलें गेलें नाही तें छापले असतें तर प्रादेशिक काव्याचा उत्कृष्ट नमूना डोळ्या समोर दिसला असता. पण मराठवाड्याच्या सारस्वताच्या दुर्दैवानें श्री. नरसीकर यांना तरुण वयांत काळानें आपल्या ओढून नेले. प्रादेशिक

वाङ्मयाची परंपरा महाराष्ट्रांत अजून पूर्णपणें रूढ झाली नाहीं तरी पण निरनिराळ्या लेखकांनीं आपल्या कादंबऱ्या नाटकांतून निरनिराळीं स्थळ घालून ही उणीव दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. नागपूर प्रांताची पार्श्वभूमि शाप, धबधब्याच्या धारेंत, गोंडवनांतील प्रियंवदा, ध्येयाकडे, हिंदोळ्यावर वगैरे कादंबऱ्यांतून दिसून येते, मुंबई पुण्याचे उल्लेख तर पुसूंच नका, त्यांतल्या त्यांत नायक नायिकाच्या पदाघातांनीं चौपाटीच्या वाळूची माती झाली आहे व फर्ग्यूसन कॉलेजच्या मागची टेकडी झिजून सपाट झाली आहे कोकणचें वातावरण दोन ध्रुव वगैरे कादंबऱ्यांतून प्रगट झालें आहे गोमांतकाला तर सुखठणकर ( सह्याद्रीच्या पायथ्याशीं ) सरदेसाई ( कल्पवृक्षाच्या छायेंत ) व सांवडेकर, बोरीकर इत्यादि नामांकित लेखक मिळाले आहेत. पण मराठवाड्याला अजून कोणीच साहित्यिक मिळाला नाहीं. महाराष्ट्रीय लेखकांची प्रतिभा सोलापूरच्या अलीकडे व मनमाडच्या अलीकडे येण्यास कां बिचकते कळत नाहीं आणि ती हैद्राबादेपर्यंत आलीच तरी पुण्याचे किंवा नागपूरचें रिटर्न तिकीट खिशांत ठेवूनच येते, म्हणजे चोवीस तासाच्यावर इकडे राहायला नको. त्यामुळे अगोदर [illegible] भागाचें वर्णन नाहींच पण असलें तरी विकृत नी भडक स्वरूपांत वर्णन केलेलें आढळतें. हा भाग म्हणजे मोगलाई, वाटेल तीं कृत्ये इकडे पचूं शकतात ( मधली स्थिती, ह. ना. आपटे ), इकडे तेलगणांत गुप्त टोळ्या आहेत, ( श्वेतांबरा ) इकडचे जहागिरदार गबाळे, निसत्व व पैसेवाले व खुशालचेंडू आहेत, ( प्रेमलाभे प्रेमळांना या लघुकथेंत ) संस्थानांतला ब्रम्हदेवच निराळा, ( पद्मिनी फिरती दारोदार या लघुकथेंत ) कलावंतिणीकरितां तीस हजार रुपये काढून ठेवणारे जहागिरदार येथें आहेत. ( प्रवासी. ना. सी. फडके ) येथें ब्राम्हण लोकांत ही गोषा आहे. ( पातिव्रत्याची कसोटी जानकीबाई कृत ) येथें हकीम लोक सुद्धां अत्याचार करूं शकतात वगैरे अत्यंत भडक नी विकृत चित्रण येथील परिस्थितीचें करण्यांत येतें. या अन्यायाचें परिमार्जन झालें पाहिजे. चाळीस लाख लोकांच्या कांहींच आकांक्षा, इच्छा वगैरे नसतील कां ? त्या सर्व बर

वर्णिल्या सारख्याच आहेत का ? पण सर्वांत अक्षम्य अपराध आपल्या येथील लेखकांचा आहे देवगिरी, परांडा, गोवळकोंडा, बीदर वगैरे प्रख्यात किल्ले, पैठण, आंबेजोगाई, औंढा, परळी, तुळजापूर ( मेडोज टेलरनें तुळजापूरचें वर्णन आपल्या 'तारा' कादबरींत उत्कृष्ट केलें आहे ) गाणगापूर, माहूर जांब वगैरे क्षेत्रे, असई उद्‌गीर राक्षस भुवनचीं रणक्षेत्रें, विठ्ठल सुंदर, जानोजी निंबाळकर, रावरंभासारखे रणझुंझार योद्धे, ज्ञानेश्वर, रामदास, एकनाथ, दासोपंत वगैरे संत कवी, गोदावरी, कृष्णा, तुंगभद्रा व भीमा सारख्या नद्या जेथें आहेत त्यांत आमच्या लेखकांना स्फूर्ति सांपडू नये हें आमचें केवढें दुर्दैव होय ! मराठवाड्याच्या लेखकांना माझा खुला सवाल आहे. मराठवाड्याची साहित्य भूमि निर्वीनिल सारखी झाली आहे काय ?

समाप्त